# पद्य-पुष्पहार

## भाग ४ था.

शैशवेऽभ्यस्तविद्यानां यौवने विषयैषिणाम् ।
वार्द्धके मुनिवृत्तीनां योगेनांते तनुत्यजाम् ॥
रघु. १-८

हें पुस्तक

**गजानन गोपाळ जोशी**

**पेन्शनर स्कूलमास्तर,**

यांनीं तयार केलें





**सन १९३१**

**किंमत १२ आणे**



हें पुस्तक **कन्हैयालाल सिताराम तिवारी** यांनीं
नाशिक येथें **तिवारी** छापखान्यांत छापिलें व
**गजानन गोपाळ जोशी,** यांनीं नाशिक येथें प्रसिद्ध केलें.





# प्रस्तावना

श्री. गजानन गोपाळ जोशी यांनीं आपल्या पद्य–पुष्पांचे तीन हार या पूर्वींच सरस्वतीच्या चरणीं वाहिले आहेत. या त्यांच्या सरस्वतीवरील भक्तीनें प्रसन्न होऊन तिनें वाङ्मयमंदिरांत श्री. जोशी यांना आधींच प्रवेश मिळवून दिला आहे. आज तीस वर्षे त्यांचीं काव्यें जनतेपुढे आहेत. उतार वयांतही त्यांचा उद्योग तरुणांना अनुकरणीय आहे. अशा वयोवृद्ध व्यासंगी व वाङ्मय मंदिरांत प्रवेश मिळविलेल्या गृहस्थांनीं मी त्यांच्या चौथ्या पुष्पहारास पुरस्कार लिहावा असा आग्रह धरावा, याचें मला नवल वाटतें. माझ्या हातून सरस्वतीच्या कंठांत घालण्याजोगा एकादा हार तर राहोच, पण त्या योग्यतेचें पुष्पही तयार झालें नाहीं, पण अनुभवी माळाकार, केव्हां केव्हां माळ हातांत धरण्याजोगी करण्यासाठीं हिरव्या पानांची पुरचुंडी करून तिला दोरा गुंडाळतात. श्री. जोशी यांनीं माझीं हिरवीं पानें पुष्पहाराबरोबर नेण्याचा आग्रह धरिला तो याच दृष्टीनें, व मीही सरस्वतीच्या चरणीं बसावयास मिळतें, मग ‘ नाहीं’ कां म्हणा ! म्हणून ओढून धरिलें नाही.

पुरस्कार लेखक हा परीक्षकही नव्हे व टीकाकारही नव्हे. त्याची भूमिका निराळी, पुरस्कर्त्याचें काम परिचय करून देणें हें होय. पुस्तक घेतल्यावर तें उघडून अगदीं अथपासून इतिपर्यंत वाचून स्वतंत्रपणे आपलें मत बनविणारे वाचक प्रायः थोडेच; त्यांना मजसारख्याच्या पुरस्काराचा उपयोगही नाहीं. परंतु काव्याचा वाचक या नात्यानें माझा अनुभव असा कीं, पुस्तक हातीं घेतल्यावर त्याची प्रस्तावना पहावी, अर्पण-पत्रिका पहावी, पुरस्कार कोणीं लिहिला, काय लिहिला हें ध्यानांत घ्यावें. पुरस्कारांत कोणत्या काव्याकडे लेखकानें अंगुलि--निर्देश केला आहे, त्यांतलि कोणता गुण निर्दिष्ट केलेला आहे याचा तपास घ्यावा व मग त्या अनुरोधानें आंतील काव्यें वाचावीं. मला वाटतें बहुतेक वाचक याच मार्गाचा अवलंब करतात. पुष्पहाराची उपमा देऊनच सांगावयाचें तर माळ्यापासून पुष्पहार विकत घेतल्यावर त्यांतील गुलाब, मोगरा, चाफा, वगैरे सुवासिक पुष्पांचा परिचय मालकास फारसा आयास न देतां करून देण्यासारखें हें गोड काम आहे.

प्रस्तुत पुस्तकांत मुलांस उपदेश संकीर्ण पद्यें, व बृहदारण्यकोपनिषद अध्याय ४ था यांचें भाषांतर, असे तीन भाग आहेत. श्री. जोशी ह्यांची कविता जुन्या वळणाची आहे. आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या काव्यावरून कवीचा वेदांताकडे ओढा अधिक असावा. व देशभक्ति हा त्यांच्या काव्याचा विषय नसावा असें साहजिक वाटत होतें, व हा अभिप्राय माझे मित्र प्रो. पाटण-

कर यांनीं पद्यपुष्पहाराच्या दुसऱ्या भागास प्रस्तावना लिहितांना व्यक्त केली आहेही, परंतु श्री. जोशी यांच्या काव्याचा हा भाग वाचणारास त्यांना राष्ट्रीय भावनेस चालना देणारीं गीतेंही चांगल्या रीतीनें रचितां येतात हें लक्षांत येईल. आधुनिक विषय जुन्या वळणाच्या वृत्तरचनेंत रचणारे विद्यमान मुकुंदराय (श्री. मिरजकर) यांच्या व श्री. जोशी यांच्या कवितेत मला बरेंच साम्य आढळून आलें. जुन्या पद्धतीचा पोषाख केलेल्या आधुनिक आंग्लविद्याविभूषिताकडे पाहून दृष्टीला चमत्कारिक वाटलें तरी वाईट वाटत नाहीं, उलट आदरच वाटतो. शब्दार्थांची सहजता हा कवीचा गुण लक्षांत भरण्याजोगा आहे. काव्य वाचित असतांना अर्थ बोध होण्यास सहसा अडचण पडत नाहीं व काव्यांतील शब्दही मोठ्या प्रयासानें एकत्रित केले आहेत असे वाटत नाहीं. आपल्या काव्यासाठीं शृंगारसंभाराची पूर्व तयारी करावी व रेखून पट्टीची कविता लिहावी हें श्री. जोशी यांचें उद्दिष्ट नाहीं; त्यामुळें कल्पनेची चमत्कृति, उपमेचें कौशल्य, व यमकांची ठाकाठिकी डोळ्यांत भरण्याजोगी नसली तरी कवितेंत प्रसाद आहे. कांहीं इतर कवींच्या काव्यांत कधीं कधीं शब्दांच्या व उपमेच्या कृत्रिमपणाशीं हिसके घेऊन अर्थबोधाची प्रचीती होते. व 'हुःश' करून 'सुटलों बुवा एकदाचा या कवीच्या माऱ्यांतून!' अशी वाचकांची स्थिति होते. केव्हां केव्हां मनोरंजनार्थ काव्याचें पुस्तक हातीं घ्यावें तों आंतील मजकुराशीं दोन हात केल्यावांचून मनोरंजन पदरीं पडत नाहीं, असा पुष्कळ वेळां अनुभव येतो. केव्हां केव्हां गूढ काव्याचें कवच फोडीत असतां स्वतःची नखें दुखण्याखेरीज कांहींच प्राप्ती होत

नाहीं. तसें श्री. जोशी यांचें काव्य वाचून वाचकास होणार नाहीं असें मी वाचकांस अश्वासन देऊं शकतों. 'राष्ट्रगीता' या कवितेंत-

'आयर्लंड, इजिप्त देश मिळवी स्वातंत्र्य एकीमुळे ॥
युद्धाने जगतास हे शिकविलें, सेवा तयाचीं मुळें ॥
एकीचें जल की विचार–तरुला घाला, तया वाढवा ।
हे राष्ट्रीय–सभा जनास कथिते "गीता न हो गाढवा" ॥ पा. ४ क. ८

तसेंच—

'तुला अर्पिली ही गड्या गोड गीता।
मुखी गाइ वागे जशी कृष्ण–गीता ॥
स्तवावें, स्मरावें, कथावें जनाला ।
जरी यांतलें सत्य वाटे मनाला ॥ पान ४ क. ९

हे एका मागून एक आलेले विचार सुटसुटित शब्दांत मांडलेले वाचकास आढळून येतील. तसेंच कविता अनेक वृत्तांत रचिली असल्यामुळें बदलत्या वृत्तांचा हा वामनी थाट काव्यवाचन कंटाळवाणें होऊं देत नाहीं. अगदीं हवा तेथेंच वृत्त बदल केल्यानें वाचतांना मनाला आनंद होतो. 'भारत-भू-गीता' या कवितेंतील शेवटचा श्लोक पहाण्यासारखा आहे,

समुद्रोदकें वेष्टिलें अर्ध देहा ।
वरी कंचुकी पर्वताची, वदे हा ॥
किती दूध वाहे स्तनीं माउलीच्या ।
नमावें मुलांनीं पदाला सतीच्या ॥ पान २ क. ७

यांतील उपमा गोड आहे. याच काव्यांत व्यक्त झालेले विचार

व्यापक, राष्ट्रीय दृष्टीचे निदर्शक आहेत. उदाहरणार्थ—

पार्शी, यावन, बौद्ध, जैन, सगळे हे धर्म जो चालवी।
सर्वांच्या हृदयांतरांत बसतो सद्वृत्तिला चाळवी ॥
ऐसा भारत–राष्ट्र–सूर्य उगवो, सद्भावना जागवो ।
अज्ञानांध–जनास जागृत करो, स्वातंत्र्य हें गाववो ॥ पा. २ क. ६

राष्ट्रीय वृत्तीची ही व्यापक भावना तरुणपिढीच्या मनावर ठसली पाहिजे यांत शंका नाहीं. अंतःकरणांत जोरकसपणा असल्यावर तो शब्दांतही व्यक्त होतो. नोकरशाहीची सुलतानी, लालाजींच्या हद्दपारीस कारणीभूत झाल्यामुळें राग येऊन कवीनें व्यक्त केलेले जोरदार विचार हिंदराष्ट्रगीता यांत व्यक्त झालेले आहेत.

या पुस्तकांतील "पेशव्यांची इमारत" ही कविता पुष्कळ दिवस वाचकांच्या स्मरणांतून जाणार नाहीं. पेशव्यांची इमारत आपली हकीकत सांगतांना पूर्व वृत्ताचें वर्णन झाल्यावर हल्लींच्या स्थितीबद्दलचें तिचें आत्मवृत्त पुढील प्रमाणें आहे.

राज्याचा करितें विचार धरितें पैसा नृपाचा करीं ।
वागें सांप्रत मी अशी जरि, तरी होते फुका चाकरी ॥
साध्वीला पतिवांचुनी सुख नसे प्राणाहुनी आवडे ।
गेला हो पति मी कशास जगलें, प्रारब्ध हो वांकडें पा. २७ क. ८

पाहोनी मजला जनास सगळें ऐश्वर्य कां नाठवे ।
त्यांचें चित्त कधीं विचार दुसरे घेई न कां हो नवे ॥
यंत्र तीं बनली, अ[illegible] मज दिसे पोटाविणें ना सुचे ।
ज्ञाते हे करिती जगांत असले मूर्खा न तें कां रुचे ? पान २७ क. ९

या दोन कविता कवीच्या काव्याचा नमुना म्हणून समजण्यास हरकत नाहीं. शिक्षकाचें कर्तव्य शिक्षकानेंच सांगावें असें श्री. जोशी यांची त्या विषयावरील कविता वाचून वाटतें. श्री. जोशी म्हणतात.

उद्यान चित्त करि सद्गुण बीज लावी ।
स्पर्धा करी सदुपदेश, लता फुलावी ।
घाली सुसंत--वचनोदक योग्य वेळीं ॥
देती फळें मधुर बालक--वृक्ष वेली, पान ३३ ५

कसलेल्या कवीच्या काव्यांत आणखी ती कोणती ठाकठिकी सांपडेल?

असे पुष्कळ उतारे देतां येतील, परंतु सुगंधाचा परिचय करून देण्यास एवढे नमुने बस्स आहेत. श्री. जोशी हे जुन्या वळणाचे व नव्या विचाराचे कवि आहेत. त्यांच्या शब्दांत सहजता आहे. भाषेत जोरकसपणा आहे. बदलल्या वृत्तांचा वामनी थाट व्यक्त दाखविण्याचें सामर्थ्यही आहे. कधीं कधीं वृत्तबद्धतेंत ढिलाई किंवा अनवश्यक शब्दांचें अस्तित्व आढळून आलें तर तें क्षम्य आहे. कोणाची कविता वधू पुरता शृंगारसाज झाल्यावर बाहेर पडावें अशा वृत्तीची असते, तर कोणाच्या कविता वधूला उद्यानांत साध्या पोषाखांत स्वैर सहल करावीशी वाटते. तिच्या अव्यवस्थितपणाकडे कोणी बोटें दाखवितील तर कोणी तिची सहजता वाखाणतील. हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा दोष आहे. विश्ववंद्य शेक्सपियर किंवा कालिदास तर राहोच, परंतु बऱ्याच वरच्या श्रेणींतील वामन, मोरो-

पंत किंवा आधुनिक केशवसुताशीं या कवीची तुलना करण्याचा वेडा विचार प्रस्तुत लेखकाच्या डोक्यांत आलेला नाहीं. व तशी बरोबरी करण्याच्या भ्रमापासून श्री. जोशी हेही मुक्त असतील. परंतु या वरच्या श्रेणीवरून खालीं उतरल्यावर कवींच्या दरबारांत श्री. जोशी यांनीं आपल्या गुणांनीं व उद्योगानें बरेंच वरचें स्थान पटकावलें आहे यांत शंकाच नाहीं.

नासिक
२३-७-३१.

रा. वि. अेातुरकर. एम्. ए.
प्रोफेसर, एच्. पी. टी. कॉलेज.
नासिक.



# अनुक्रमणिका.

## ( ३ ) सृष्टिविषयक भावना.



## [ ४ ] मुलांस उपदेश [ शतक ]

[ ५ ] बृहदारण्यकोपनिषद्








# १ राष्ट्रीय-भावना



(१)

## भारतभू-गीता ( राष्ट्रीय )

### श्लोक

‘ माझा भारत देश ’ भाव हृदयीं जी देवता जागवी;
तीतें वंदन मी सदैव करितों ती माय कीं शांभवी;
भाषा, जात, कुलादि, हें तम पळो, स्वाराज्य-तेजो-रवी,
भेदाभेद जगांत आज दिसती, ते सर्वही माळवी, १

संपत्ती वसते जगांत विपुला सृष्टींत जी मंगल,
व्यापी उत्तर दिक् हिमालय महान्, सह्याद्रि विंध्याचल
दैवी शक्ति जयामधें विलसते नानाप्रकारें सदा,
रत्नांची वसुधा स्वकीय जननी वंदीन मी तत्पदा. २

गंगा, सिंधु नद्या अनेक निघती संपत्ति घेवोनिया,
देशाला करिती सुपीक सुमनें, धान्यादि देवोनिया,
ज्यांचें स्नान तसेंच पान करितें सद्भावना जागृत,
यांची जी जननी, पदास नमितों ही होय भूभारत, ३

जेथें होते कविवर पहा, कालिदासासमान
जेथें देती जनक-नृपती याज्ञवल्क्यास मान,
ज्यांच्या जागीं चमकत असे बोस, टागोर आज,
वाटे मातें अरुण उगवे हिंद-भू-सूर्यराज ४

झाले वीर अनंत युद्ध करिती भीमार्जुनादि रणीं,
गीता ही कथिली तयांस विभुनें हो दक्ष भूरक्षणीं,
गीता-मंथन हें अनेक करिती कालापरी लाविती
कर्माचें नवनीत 'बाल' वदति ' निष्कामकर्माप्रती '. ५

पार्शी, यावन, बुद्ध, जैन सगळे हे धर्म, जो चालवी,
सर्वांच्या हृदयांतरांत वसतो, सद्वृत्तिला चाळवी,
ऐसा भारतराष्ट्र-सूर्य उगवो सद्भावना जागवो,
अज्ञानांध-जनांस जागृत करो, स्वातंत्र्य हें गाववो. ६

समुद्रोदकें वेष्टिलें अर्धदेहा,
वरी कंचुकी पर्वताची, वदे हा,
किती दूध वाहे स्तनीं माउलीच्या
नमावें मुलांनीं पदाला सतीच्या. ७

---

## ( २ )
# राष्ट्र-गीता



झाली जागृत राष्ट्र-शक्ति बुध हो, या भारतीं सांप्रत,
सेवावें हृदयीं सदैव तिजला, ध्यानीं, मनीं तद्गत,
यावें हिंद-जनां ‘ स्वराज्य ’ सगळें, घाला बहिष्कार हा,
हें राष्ट्रीय-सभा जनांस कथिते, पायीं तिच्या हो रहा १

जाती, धर्म, तसेंच कर्म दिसतें देशांत या वेगळे
यांचा काय विरोध राष्ट्र-विषयीं; राष्ट्रैक्यता कां गळे !
पाहोनी जगताकडे क्षणभरी, ‘ स्वातंत्र्य ’ भक्ती करा,
हें राष्ट्रीय-सभा जनांस कथितें, हृन्मंदिरीं तें धरा २

लावोनी तुमडी हरी धन पहा, व्यापाररूपें किती !
‘ काळा ’ ‘गौर’ असें मनांत धरिती, काळ्यास ते गांजिती;
देवाच्या घरचीं समान असतीं हीं माणसें सर्वदा,
हें राष्ट्रीयसभा जनांस कथिते, कां भोगितां आपदा! ३

नेला द्रव्य-निधी अपार अपला वारांगना-नीतिनें,
जागे व्हा अजुनी, स्वतेज सगळें ही आसुरी-नीति ने,
गेलें धैर्य तसेंच शौर्य हरिलें ! निर्वीर्य झालें कसें !
हें राष्ट्रीय-सभा तुह्मास कथिते, जागें मनीं व्हा कसें ४

कारागीर कला, तशी कुशलता नेली पहा; आपली;
यंत्रानें करिती पदार्थ सगळे, विद्या कला लोपली,
आहे ताजमहाल, साक्ष दुसरें प्रासाद किल्ले किती
हें राष्ट्रीय-सभा जनांस कथिते, ते राज्य कां हाकिती ५

पाळावी ' सहकारिता ' स्वविषयीं राष्ट्रैक्य व्हावें तरी,
भेदाभेद जनांतले विसरुनि एकी करा अंतरीं;
राखावी हृदयीं पराऽसहकृती ' स्वातंत्र्य ' यावें जरी,
हें राष्ट्रीय-सभा जनांस कथिते आज्ञा करा साजरी. ६

सांगे कर्मरहस्य या तिलक कीं ' निष्कामकर्मे ' करा,
गांधी सर्व जनांस हेंच कथितो जें आचरी तो करां,
त्यांतें देव असें म्हणून भजतां ' संन्यास-योगी ' तसें;
हें राष्ट्रीय-सभा जनांस कथिते, सर्वांमुखीं गातसे, ७

आयर्लंड, इजिप्त देश मिळवी 'स्वातंत्र्य' एकीमुळें,
युद्धानें जगतास हें शिकविलें, रोवा तयांचीं मुळें,

एकींचें जल कीं विचार तरुला घाला, तया वाढवा,

हें राष्ट्रीय-सभा जनांस कथिते ' गीता न हो गाढवा[१] ' ८

तुला अर्पिली ही गड्या, गोड गीता
मुखीं गाई, वागे जशी कृष्ण-गीता
स्तवावें स्मरावें, कथावें जनाला
जरी यांतलें सत्य वाटे मनाला ९



( ३ )

## हिंदराष्ट्र-गीता

लालाजीला असहकृतिनें घातलें बंदिवासीं,
राष्ट्रासाठीं तनु-मन-धना अर्पिती हिंदवासी,
पुत्रप्रेमें बहु तळमळे, तापली हिंदभूमी,
पाश्चात्यांची नय-मति-कृती नष्टली दैवभूमी. १

स्तनाचें जिच्या दूध शोषून नेलें,
जिला खावयाला न कांहींच ठेलें,
गळा हो तिचा कापितां आज काय ।
रडे हिंदभूमी, करी हाय ! हाय ! २

[१] गाढवापुढें वाचली गीता कालचा गोंधळ बराच होता ' ही ह्मण प्रसिद्ध

‘ शिवाजी ’ वदे जों घडे राजदंड,
तयाचीं करीं स्मारकें, न्याय ! बंड !
दिला ‘ बालकाला ’ कसा बंदिवास,
किती दुःख भोगी, नसे तो निरास ३

तया मोंगलाला कसे दोष देतां
कुठें कायदा, न्याय कीं व्यर्थ नेता !
‘ स्वयंनिर्णयाचें ’ कुठें तत्त्व गेलें
कृतीनें पाहतां खरें सर्व मेलें ४

‘ महात्मा ’ असें गांधीजी तो जगांत
तयाच्या यशा दैवतें नित्य गात.
सदा राष्ट्र-कार्यीं धरी प्रेम, शांती,
मुलें ‘गांधि’ ‘गांधी’ तया नित्य गाती. ५

जनीं भेद रूपें जरी राज्य केलें
परंतू जनाच्या मनीं हें उदेलें
असे पारशी, यावनी जाति-भेद
परी राष्ट्र-कार्यीं असूं एक वेद ६

चला आज कारागृहीं सर्व जाऊं
सदा अंतरीं हिंद-मातेस गाऊं
नसे अस्त्र शस्त्रादि कांहीं करांत
‘ बहिष्कार ’ सत्याग्रहादी निवांत; ७

असे 'दाम' विश्वास, आशा जनाचा;
तसा प्राण आहे खरी राष्ट्र-वाचा
असे 'नेहरू' बंधु 'अली अनेक,
मनीं निश्चयें एकी ठेवूं विवेक ८

कसा 'सिंह' जागा मनीं आज झाला
स्वयें बंदिवासी करूं बांधवाला
अशी राष्ट्र-वृत्ती, कृती होय जागीं
स्वराष्ट्रामधें कां उरे बा, अभागी ९

करा राष्ट्र-सेवा, नका धीर सोडूं
मतें जाति-भेदें नका एकि मोडूं
जगाची कृती काय चाले पहावी
बना 'कर्मयोगी' धरा हिंद गावी १०

---

## (४)
## संक्रांतीचा हलवा (राष्ट्रीय)

झाली **क्रांती** कितितरि सख्या हिंदलोकांतरांत;
देशासाठीं तनु-मन-धना त्यागिती ते नितांत,
राष्ट्रैक्याचा ध्वज मिरविती, ध्याति, गाती सदैव
संक्रांतीचा तिळगुळ खरा वाटतें राष्ट्र-दैव. १

स्वातंत्र्यानें मिळवुं ह्मणती राज्य आतां जगांत.
मोडूं तैशी परसहकृती, एकिचें गीत गात.
प्रेमाची, गा, हळु हळु मनीं बंधनें आवळावीं,
संक्रांतीचा मधुर हलवा भावना ही वळावी, २

राष्ट्र-प्रेमें सुरस करिती नागपूरांत गीत,
बाळे मेळे करिति सगळे **हिंदराष्ट्र स्वगीत,**
गेले सारे विसरुनि पहा, जाति-धर्मादि भेद
संक्रांतीचा धवल हलवा स्नेह भावें अभेद ३

पंजाबाला बहुत छळिलें न्हाणिलीं देश-माता,
वृद्धां बाळा सहज पिडिलें घोर आक्रांत आतां,
संतापानें हृदय उलतें वाहती अश्रु आज;
संक्रांतीला परसहकृती सोड, टाकून लाज, ४

राष्ट्रासाठीं धरि सहकृती बांधवांची मनांत,
देशोद्धाराविण न सुगती एक व्हावें जनांत;
अद्वैताची खचित महती काय वेदांत सांगे,
वागे चित्तीं, परि कृति विना होइना कार्य सांगें ५

व्यापारानें स्वधन हरिलें वीर्य, वा, दीन केलें
त्या युद्धानें वर भर पडे, जाहलों कां भुकेले
पर्जन्याची मग अवकृपा, वांकडें दैव झालें,
चंपारण्यीं छळिति अबला गौर हे मोह-जाळें ६

दुर्दैवाची तुजसि कथिली काहणी गोड आज
एकी व्हावी त्यजुनि दुबळे भेद यावें स्वराज
अंतः प्रेमें खचित खचिती अंतरें प्राज्ञ लोकीं
संक्रांतीचा सुरस हलवा गोड हा कीं विलोकी ७

तिलक पादरजांस नमूं करें
हृदय-मूर्तिस सेवि, न मूक रे
तनु-मनें भरतांतर सेविलें
तिळगुळास निरंतर भाविलें ८

---

(९)

## संक्रांतीचा हलवा ( राष्ट्रीय ) १९२९



### श्लोक

**क्रांती** सूर्य करी, वरी मकर-दिग्यामी-वधू-सुंदरी–
तेजस्वी किरणें, प्रसन्न सुमनें सृष्टीस हृन्मंदिरीं
रात्री होती कृशा निशापति-वशा वासंतिका शांतिला–
तारे लुसकरें रवीस नमिती, पाहे जगत्क्रांतिला १

क्रांती सृष्टी करि, नद्या रुसुनिया जाती समुद्राकडे
होते मानव-शक्ति तुच्छ, विपुला दावी जरी आंकडे

[१]साम्राज्य-प्रकृती जिथें विलसते ती दीन झाली पुरी
ज्ञाते राज-कृतींत वाग्पटु, परी ते दीन अंतःपुरीं. २

आहे ही कुटिला नृपाल-पदवी बुद्धी हरी, वैभव,
पोटाची खळगी भरे न ह्मणुनी रौद्र-स्वरूपी भव,
ऐसा हा झगडा जगांत दिसतो या मानवी कोटिचा
" अभ्युत्थानमधर्म " कृष्ण कथितो जो बाळ चित्कोटिचा ३

क्रांती धर्म, समाज आज करितोः—उद्योग, धंदे किती—
गेले सर्व रसातळांत, बुडले, वीर्यत्वही टाकिती
पाहे हा जन बंधनीं गुरफटे, " स्वातंत्र्य " हे शाद्बिक
गेलें वैभव हे हळू हळु पहा, संक्रांति ही आद्बिक ४

शास्त्रें, काव्य, कला जगांत लपलीं पाश्चात्य-संशोधनीं
ऐश्वर्ये नटली जरी भरत-भू, हो शून्य तद्बंधनी
ऐसें बंधन हें सुटेल भरत-स्नेहांगणीं खेळतां
सेवावी जगतांत वीर जन हो, स्वातंत्र्य चिद्देवता ५

[ ६ ]

## स्वाराज्य मंडलोद्घाटन श्लोक



द्यावें हिंद-जना स्वराज्य ह्मणुनी आला तुम्ही भारती

१ लंडन

सद्बुद्धी तुमची जनांत विलसो ओवाळितों आरती;
युद्धानें जन- मानसीं उगवला स्वातंत्र्य- तेजो-रवी;
धन्या हो सुमती, पराक्रम रणीं शत्रूस जो हारवी १

लोकांचें हित तेंच राज्य अपलें ही भावना जागवी,
राजा तो असतो खरोखर जगीं लोकां न जो नागवी;
देतां हिंद-जनां स्वराज्य, नृपते, औदार्य हें दावितां,
धन्या कीर्ति असो जगांत तुमची साम्राज्य-भू-देवता. २

देवो चंद्र-रवी प्रकाश सगळा, तारे तसा आपला;
तैशी कीर्ति-पराक्रमा न तुलना, लोकांत जो व्यापला;
त्यांची नित्य गती यशास, मिळु दे साम्राज्य-भू-मंडला
होवो अस्त कधीं न भूत रविचा, देवा, जगन्मंडला. ३

वाणीला यश पूर्ण अर्पण करो श्री शारदा-देवता;
बाहु-क्षात्रिय-तेज इंद्र तुजला देवो रिपु ध्वंसिता;
लक्ष्मी जोडूनिया करांस विपुला देवो स्वतेजो-निधी,
गावो गीत सुरांगना सुरवरीं, लाजो तुला तो विधी ४

अग्नी देवो तुजसि नृपते, आपली नित्य-कांती;
वायु देवो तुजसि सुगती, भूमि ही पूर्ण शांती;
व्यापी अर्पो नभ तुजसि गा, शुद्ध तें देइ वारी,
भूतें ऐशी तुजसि नमिती, कोण तूतें निवारी. ५

राष्ट्रें सारीं तुजसि नमिती आपली मान लोकीं;
तैशा त्रिया स्तविती तुजला स्नेहभावें, विलोकी;
लोकांमध्यें तुज वश कला जाहल्या सर्व आज
लोकांचें गा, हित करिसि तूं देउनीया स्वराज्य ६

यावी बुद्धी तुजसि विभुनें राज्य संपूर्ण द्याया;
चित्तीं नांदो नच विषमता, हिंद लोकांस द्या या;
ऐशीं कृत्यें करिसि जरि तूं कीर्ति ही गाति लोक
साम्राज्याचें खचित नृपते, सार हें गा, विलोक ७

---

[ ७ ]

## लक्ष्मीपूजन. आर्या ( गीति )



जन हो, पूजन करितां श्रीचें दीपावळींत जें आज,
पाहूं विचार करुनी आहे कीं मुख्य त्यांत तें काज १

मानिति सुवर्ण-रौप्या लक्ष्मी, ती सत्य काय हो, आहे
' ऐश्वर्य ' चार वर्णी लक्ष्मी जी तीच सत्य वा, पाहे २

लक्ष्मी द्विजांस आहे ' ज्ञान, ' तसें ' शौर्य ' वीर जनिं आहे
' व्यापार ' वैश्य-लक्ष्मी शूद्रामी ' चाकरी ' सदा पाहे ३
जें ब्राह्मणांत असतें ब्रह्माचें तेज तें कुठें सांगा

दिसतें काय तुम्हातें विषयाचा भोग ब्राम्हणीं जागा ४

कोठें शम, तप आतां, विश्वामित्रादि काय हो, मोठे
वर्णावें कितिक तया मुनिवर्यां मंदबुद्धिच्या ओठें ५

लोपविलें ज्या तेजें क्षात्रादिक सर्व, आज नच उरलें
पूजन कसें करावे ! ज्ञानादिक सर्व संपदा हरलें ६

संगर सदा करावा, रक्षावी जी प्रजा असे जगतीं
कारिती असे किती नृप, पोट भराया जणो, जगीं जगती ७
श्रीरामदास—तेजें, ब्रम्हेंद्रस्वामिच्याहि तेजानें
बाजी शिवाजी झाले क्षत्रिय शौर्यत्व योग्य तें ज्यानें ८

दादांनीं लावियला शौर्ये अटकेवरी कसा झेंडा
यवन—रिपु कापियला खाटिक कापी पहा, जसा मेंढा ९
क्षत्रिय-विवाह आहे स्वयंवर, मुली गुणी-जनां वरिती
वीर-जननी असावें रात्रंदिन हचि याचना कारिती १०

ऐसें क्षत्रिय असती सांग मला कितिक आज या देशीं
सीमोल्लंघन करिसी विजया-दशमीस काय तूं देशी ११
ऐशी क्षत्रिय-लक्ष्मी गेली ही, व्यर्थ पूजितां कोणा !
दरडावितां सहज तरि जाउनि बसतां कसें तुम्ही कोणा !१२

व्यापार दूर गेला वैश्यांचा, हें न सांगणें कां तें !

चाले ' स्वदेश-चळवळ ' कीं ' वंदे मातरम् ' नमीं मातें १३

माल स्वदेश घ्यावा, आज मनें जागवा कशीं निजलीं !
ऐसें वाटे सर्वां व्यापार लक्ष्मी दुरी पहा, रमली १४

यंत्रें अगणित झालीं मानवशक्ति टिके न त्यां पुढती;
द्रव्यौघ वाहतो हा हिमगिरि-सरिताऽब्धिला जणो, मिळती १५

व्यापार सर्व गेला वैश्यांचें कार्य काय गा, उरलें !
पूजन करिसीं कुणाचें ! दारिद्र्यें भारतास व्यापियलें १६

लक्ष्मी शूद्राची जी वसे घरोघर न सांगणें आतां
हें बोलणें कठिण तरि, करि क्षमा बालका न कां माता १७

रूढी चालत आली वागावें त्या परी न चुकवावें
सत्य तयांत पहावें सुज्ञांनीं बालकांस शिकवावें १८

पूजन करितां आले विचार मानसिं तसेंच मांगितलें
जी तीन वर्ग लक्ष्मी गेली, शूद्रत्व शेष गा ! उरलें १९

---

[ ८ ]

## स्वातंत्र्य-लतिका श्लोक

विद्युत्तेज-लता नभीं चमकली मेघोदकीं जन्मली,
दिव्यांगें नटली रवि, शशि सुमें तेजोनिधी पातलीं

व्यापी सर्व जगा—चराचर भितें तें अंतरीं कांपतें
सांगे, कोण तिला करांत धरितो ! श्रीसच्चिदानंद तें १

वाहे निर्झरिणी विलास-रमणी गाणीं मुखें गाउनी;
वन्यश्री खुलवी, दरीस फुलवी वासंतिका सेवुनी;
तेथें खेळति बा, निसर्ग-लतिका, बाळें मृगांचीं मुदें
गेलें वैर विरून, सर्व लपलें, आनंदलीं चिन्मुदें २

पुष्पांच्या लतिका वनीं, उपवनीं श्रीशारदा डोलवी;
गाती भृंग मुदें रसाळ कविता, मात्रा-गणां लाजवी;
सृष्टी ही रमते निसर्ग लतिका काव्यांजली वाहती;
होतो लग्नविधी मरुद्गण-करीं पुष्पें फळें डोलती ३

स्वातंत्र्यें शुक-सारिका विहरती, कुंजामधें रंगती;
गाती मोदभरें रसाळ कवनें संवेदना डोलती;
स्नेहाच्या लतिकावरी विलसती, स्वातंत्र्य-सूर्योदय—
होतां प्रीति-लता प्रफुल्ल दिसती गावा सदा चिन्मय ४

माता भारत-भू-लता विकसली येती फळें गोजिरीं
पुष्पें सुंदर हीं सुरेख फुललीं चिन्मंदिरीं साजिरी;
लेई ‘ लाल ’ ललामभूत हृदयीं हारावली सोज्वल,
गाती मोदभरें रसाळ कवनें चिद्भावना निर्मळ ५

[ ९ ]

# बांब स्फोट

बांब स्फोट कथी विचार हृदयीं वाईट कीं चांगला;
न्यायार्थीश करी निकाल दिसतो जो साजरा वाटला;
अंतर्ज्योत अशी युवन्हृदयिंची कां हो वहा, पेटली; !
राज-प्रीति-लता विलास करितां, निस्तेज कां जाहली ! १

   

आंग्लांचे उपकार हिंद-जनता भोगीं, असे फेडिले
स्वातंत्र्योपकृतिप्रति भरतभू-पुत्रा, तुवां जोडिलें;
गेलीं तीन शतें सुराज्य वरिलें, सांभाळिलें आदरें;
तद्‌भूपुत्र ह्मणून " बांब करणें " हें वाटतें कां बरें ! २

लोकांचीं हृदयें सुशिक्षित करी, शोधी तया अंतरीं;
स्वातंत्र्यास तयार त्यास करूनी हीं आंग्लभू-सुंदरी;
यंत्रें काव्य, कला तिला शिकविते आंगीं तिच्या बाणती:
" बांब स्फोट " असें विरुद्ध फल हें, कां हो मनीं आणती ३

   

रत्नांचा मणि कोहिनुर दिसतो भूपाल-शीर्षावरी;
शस्त्रास्त्रें, इतिहास सर्व लपली जाऊन देशांतरीं;

गेले वीर, नृपाल सर्व दडले त्या ार ओजस्विता;
सांगे नागविले जगांत भरता कोणीं वदे तत्त्वता ४

* * * *

द्वेषी-भाव निसर्ग-शत्रु बनला राष्ट्रांत या भारतीं;
नाहीं भाव हृदीं स्वराज्य-विधिचा ओजस्विता भारती;
या शक्ती मिळवा, जनांत ठसवा, कार्य-स्वरूपी करा;
" स्फोटानें " घडतें असें कधि तरी, शोधा पहा अंतरा ५

---

( १० )

## पंडित मोतीलाल नेहरू

### निधन श्लोक

मोतीलाल नथेवरी चमकती ते आज गेले कुठें !
होतें कुंकुम लाल काय पुसलें ! आक्रांत कीं हो उठे !
शोकें होरपले जगीं भरत-भू चिताग्निनें भाजली
राष्ट्राचीं हृदयें कृतांत-समयें देतांत शोकांजली १

राष्ट्रासाठीं तनु-मन, दिलीं संपदा सर्व कांहीं
राष्ट्र-ज्योती सरस करुनी चेतवी वर्तिका ही
ओवाळीतो भरत-सतिला आत्म-निरांजनीतें

राष्ट्रैक्याचीं धवल सुमनें वाहिलीं भू-जनीतें २

स्वातंत्र्याचा ध्वज धरुनिया चालला काय लोकीं
लालाजींला, टिळक-मुनिला जाउनी कीं विलोकी
अंतर्ध्यानें मनुज-तनुला शक्य नाहीं उपाय !
गेला स्वर्गी ह्मणुनि सखया वंदितों आज पाय ३

आलें मंडळ गोलमेज करुनी शास्त्र्यादि सारे जन
नाहीं आवडलें तुला म्हणुनि गा स्वर्गातुनी अंजन
घालावें नयनांत, योजिसि मनीं गेला तरी धावत
स्वातंत्र्यास वरी सख्या झडकरी नाहीं दुजे मागत ४

होती हाल किती स्त्रिया दुखभरी कारागृहीं तापती
शोकें विव्हळती सतीस वरिती स्वातंत्र्य आराधिती
त्यांची कां करुणा नये म्हणुनि तूं स्वर्गात जाशी वशी
वीरांची भरली सभा तिजमधें तूं जाउनी सांगशी ५

---

(११)

## मोतीलाल–तिलांजली

मोतीलाल तिलांजली तुजसि गा, देतों दहाव्या दिनीं,
आत्माराम असो रती जन-पदीं स्वातंत्र्य-चिद्वादिनी;

राष्ट्राची अधिदेवता विलसली हृन्मंदिरीं मावली;
झाली व्यापक टाकुनी नर-तनू; चालू तिच्या पावलीं १

देतो आज तुला जवाहिर करें घ्या अंजली आदरें
नातीं दोन जनांस आज दिसतीं पुत्रत्व, राष्ट्रत्व, रे,
गेला प्राण रणामधें लढुनि हा स्वर्गांत जाशी तरी
देतो आज तिलांजली जन-पद स्वातंत्र्य कार्यावरी २

यावा तैजस दिव्य देह तुजला चित्तीं कधीं दाह न;
जा निर्विघ्नपणें तुला अमर हे होती स्वयें वाहन;
जावें लौकर राष्ट्र-कार्य करण्या स्वर्गामधें सांप्रत;
लाला, बालक, दास मंडळ करी प्रेमें तुझें स्वागत ३

आलें मंडळ गोलमेज करुनी देतें तुला अंजली,
राष्ट्रैक्य-प्रतिभा जनांत विलसे जोडतिसे अंजली
भाग्यानें सगळे तुझ्याजवळ हे शास्त्र्यादि आले जन
प्रेमें आज तिलांजली त्यजुनि जें, हो मानसीं अंजन ४

गांधी चालति हे तुझी नर-तनू घेऊन खांद्यावरी
अग्नी भस्म करी परी अवतरें राष्ट्रात दिव्यांबरी
नाना-रूप धरि तुझी नव तनू स्वातंत्र्य हें आदरी
देतें आज तिलांजली नरवरा, राष्ट्रैक्य देवो करीं ५

( १२ )

[ १९३० ]

# राष्ट्रीय-संक्रमण



## श्लोक

द्वेषीभाव पहा, जनांत लढतो निःशस्त्र, शस्त्रासह
सांगे धर्मः-" रणीं विरुद्ध करणी देवासही दुःसह "
राष्ट्रैक्य-स्मृति-भावना जनपदीं चिद्वता जागते
घेते हा अवतार, या भरतभू-संक्रांतिला भोगते. १

नेती हिंद-जनास भूप्रतिनिधी देऊन आश्वासनें
' राऊंडटेबल ' ' गोलमेज ' म्हणती लोकांत विश्वास ने
गांधी, नेहरू, या पटेल वळवा होऊं नका निर्दय;
ऐशी ही करि योजना-नभ पळे स्वातंत्र्य-सूर्योदय २

क्रांती आज जगांत काय दिसते ती सर्व राष्ट्रांत या,
द्वेषाग्नी भडके, जनांत खटके, चिंताग्नि जाळी तया,
राष्ट्राचीं हृदयें पवित्र सुमनें दावाग्निनें भाजलीं;
देती त्यास तुरुंग-वास, रुजले पिऊन शोकांजली, ३

सृष्टीची प्रकृती दिसेल विकृती संतप्त हृन्मंदिरीं,
वर्षे मेघ, नद्या शरीर फुगुनी आक्रोशल्या सुंदरी,

आकाशांत उडे विमान चिरडे अग्नीमध्यें सांपडे,
ज्वाला-स्फोट घडे, मनुष्य न रडे, संक्रांति चोंहीकडे ४

बंडें उद्भवती, प्रभात समयीं गाती स्वतंत्रावली;
देशी-माल करी जनांत विकरी खादी असे मावली,
जाती शेतकरी; करा न भरिती सत्याग्रही रंगती,
शिक्षेची परवा मनीं न धरिती चाले पिकेटिंग ती ५

झेंडा-वंदन बंधन त्यजुनि हे चाले पहा, आदरें
लाठीचे बसतात घाव वरती त्यांची न त्या याद रे
" देशी माल विकाल " बाल वदती घाला बहिष्कार या
संक्रांती भरतांत कार्य करिते, आहे तिला कां दया ६

गेले मंडळ एक आज, दुसरें आलें, तिजे सांगुनी;
चाले हा क्रम सारखाच अजुनी मुंबापुरीं मागुनी
मेले आजवरी किती दुखवले कारागृहीं खेंचले
संक्रांती करिते जगांत असले ! पाहे मना बोचले ७

झाल्या गा, अबला विवेक-सबला कारागृहीं जाउनी;
काढा सूत सदा विणून कपडा प्रेमें जनीं गाउनी
चाले ही टकळी स्वराज्य चरखा खादी स्वतंत्रा वरी
सारा माल विकाल देशभर हा संक्रांति+ हो साजरी ८

---

+ सुवर्णांकित ऐतिहासिक काल.

# [ २ ] राष्ट्रीय स्मृति व जागृति

## ( १ ) खड्ग–दर्शन



( श्री. स. वि. शि. विंचूरकर यांच्या खड्गास )

खड्गातें बघुनी विचार सुचती, ते आपणा सांगतें,
ज्यानें देह रणीं सदा झिजंविला, त्याची क्षमा मागतों,
होते विठ्ठल-हस्त-भूषण रणीं, विंचूर-गांवीं असे,
आतां काय पहा, अनाथ बनुनी तो कोपऱ्यातें वसे १

वर्षे पांच शतें असे यवन-भू, झाली स्थिती दुर्घट,
धर्मातें छळिती, धनास हरिती पापें भरीती घट
झाले जे सरदार, शूर नृपती देशास जे रक्षिती
सौख्याला त्यजिती, मनांत कसली नाहीं जयाला क्षिती २

होता विठ्ठल वीर शूर समरीं, त्यांमाजि जो आगळा
त्याच्या हस्तिं, पहा सदैव विलसे, कापी रिपूचा गळा
जावोनी समरांगणीं करितसे क्रीडा रिपूच्या हृदीं
खेळे बाळक आंगणीं जणु गमे राष्ट्रास वंदी पदीं ३

जातां जो समरीं करीं बहु धरी, सद्ग्रंथ नानापरी;
ताईतीं असती कितीक लिहिती बारीक शोधा परी;
श्रीरामायण-भारतादि बघतां आनंद वाटे मना;
श्रद्धा पूर्ण मनांत होय म्हणुनी युद्धीं पुरे कामना; ४

ज्याला पाहुनिया नृपांतर थिजे, प्रत्यक्ष मृत्यूच हा
आतां स्वस्थ खुशाल त्यास बघतां घेऊन हातीं चहा
व्हावें काय असें कथा तुह्मि मला, शोधा तरी अंतरीं
कालाची गति ही कठीण दिसते रंकास राजा करी ५

झालें स्नान तसेंच पान तुजला रक्त-प्रवाहीं रणीं;
पूजा होयहि शत्रु-शीर्ष-सुमनें, कापूर-नीरांजनीं;
शत्रूचें बल-तेज सर्व हरिलीं देशास सांभाळुनी
पाहूनी स्थिति हीच आज तुमची ये कंठ हा दाटुनी ! ६

घोडा नेउनि सिंधु दावुनि पुढें, त्या आटकेभीतरी,
झेंडा लावुनि, राज्य तें मिळवूनी दे पेशव्यांचे करीं;
गंगा स्नान करून पानपतच्या युद्धांत जें पातलें:
काळानें सगळें हरून धन तें पाहे मुखीं घातलें. ७

शत्रूंच्या हृदया विदारुनि पुढें जाया मिळे वाट ते;
आंग्लांनां बघतां दुरून हृदयीं भीती जना वाटते
आहे हो नृप आज पूर्ण भरतीं, होते तसे यावन
तत्कालीं तुमचे, तयास वधिलें होते न कां पावन ! ८

शत्रूंच्या हृदया चिरून शिरला मध्ये कशाला ! अहो,
प्राणाला हरण्यास काय ! दुसरा हेतू मनीं गुप्त हो,
शत्रूच्या हृदयांतरांत वसतें जें, पाहसी जाउनी;
वाटे तद्‌हृदयासवे करिसि तूं गोष्टी तिथें थांबुनी ९

तेव्हांचा बघ; तूंच आज दिससी नाहीं दुजी प्रकृती
आतां स्वस्थ, उगा घरांत पडला, कां होइना ती कृती
होते जे यजमान आज दिसती त्यांचे अहो, वंशज;
दोघांची रणशक्ति गुप्त, अथवा हो दग्ध ! सांगे मज १०

पोलादी तनु ही रणांत असतां तूं एवढा शूर कां !
पाहूनी तुजला मनीं यवन तो झाला कसा गार कां !
दैवी-शक्ति ह्मणू तरी न दिसते आतां तुझ्या अंतरीं;
कोणी 'काल' वदे, ' कृती ' समजती कोणास सांगा तरी ११

म्लेंछांनीं छळिलें, धनास हरिलें बाहेरुनी येउनी;
केले यावन-लोक फार मशिदी हीं देवळें पाडुनी
ज्ञानग्रंथहि जाळिले कितितरी या आसुरांनीं पहा;
खड्गा, त्यासमयी खरोखर जनां झालास तूं बाप हा १२

नीती, धर्म तसे सुकर्म सगळें आहे तुझ्या आधिन;
चाले राज्य रणीं तुझें मग, जनीं आधी तशा व्याधि न
आहे केंद्र जगांत तूंच सगळ्या कार्यास वाटे, मला
तो तूं स्वस्थ घरांत होय, ह्मणुनी धर्मादि घेती मला १३

हिंसा त्यासमयीं रणांत करिसी, हें काय रे, चांगलें
ऐके बा, तुजसी खरेंच कथितों जें मानसीं वागलें
" ये जो युद्ध करावयास समरीं गांजी प्रजेतें सदा
मारो क्षत्रिय त्यास " धर्म कथितो, नेतो तया सत्पदा १४

आहे प्राण रणांत मीच बघ रे, त्या क्षत्रियांचा खरा
देई मान, धनी घरांत नसतां कोणी न त्या चाकरा
माझें शौर्य खरें रणांत दिसतें, तो काल गेला, पहा;
आला दर्शन द्यावयास ह्मणुनि आलाप केला, दहा; १५

खड्गा, दर्शन देउनी मजासि तूं जी गोष्ट गा सांगशी.
पाहे, वीर-रस-स्मृतीस नयनीं युद्धांत तूं वागशी,
वारंवार कथा सुरेख कथिसी, चित्तास ती तोषवी,
वाटे कीं मजला जगांत असती तेव्हां खरा तूं पवी. १६

---

## २ पेशव्याची इमारत ( नासिक )



१९०३

### श्लोक

होतें संचित पूर्व पुण्य पदरीं आलें स्वदेशांत मी;
योद्धे, वीर, पराक्रमी पुरुष जे, त्यांना सदा मी नमीं;

केले फार विचार मोल नव्हतें, देती स्वराज्या गती;
कोठें शूर! विचार! ते न दिसती, निर्वीर्य झाली मती १

चैतन्या दिसती सदैव सुगती आहे जरी मी जड;
झेंडा रोविति आटकेवरि पहा, दादा, अरीला जड;
गोदा, राम पवित्र यांस नमुनी धर्मास सांभाळिलें
देशाला दिसतें पवित्र मजला, तें सर्वदा पाळिलें २

लागेना मजला अशुद्ध पद या म्लेंछादिकांचें तदा;
तैशी ये सुमती, कुबुद्धि पळली, स्वातंत्र्य दे संपदा;
पोटीं साठविलें धन त्यजुनिया देशास सांभाळिलें;
शस्त्रें देउनिया रिपूस हरिलें स्वातंत्र्य ज्यां पाळिलें ३

मातें पाहुनिया मनांत थिजती, बोटें मुखीं घालिती;
होतें वैभव फार, सर्व लपलें साश्चर्य होते मती
ऐशी ही स्थिति आज काय उरली! ज्ञात्या कशी ही रुचे!
गेलें वैभव सर्व, अस्थि उरती; त्यांना न हें कां सुचे! ४

माझे सारे अवयव किती थोर ते, ज्यां न धक्का
आहे भारी बळकट तनू; साक्ष देते तुम्हां कां!
आशा होती सतत भरतीं राज्य राहो जगांत!
अस्ता गेली; जगत सगळें काळ घालीं मुखांत; ५

दुर्दैवानें झडप दिधली राज्य गेलें लयासी;

राजे गेले, पारि न सरली कां मदायुष्यरासी,
इंद्र-स्पर्शे झडकर कशी ही अहिल्या शिळा हो,
म्लेंच्छस्पर्शे अजुनि उरलें, आग लागो मला हो. ६

जडांत दिसली जशी स्वपर-भावना पूर्विच्या;
तशी न दिसते मला नरवरांत या आजच्या,
ममत्व न कसें कळे! स्वतनु ही दुज्या अर्पिती
पराविण जगीं जडा कधि नसे स्वतांची गती ७

राज्याचा करितें विचार धरितें पैसा नृपाचा करीं,
वागे सांप्रत मी अशी, जरि तरी होते फुका चाकरी,
साध्वीला पतिवांचुनी सुख न हो, प्राणाहुनी आवडे
गेला हो पति मी कशास जगलें, प्रारब्ध हो वांकडें, ८

पाहोनी मजला जनास अपलें ऐश्वर्य कां नाठवे!
त्यांचें चित्त कधीं विचार दुसरे धेई न कां हो, नवे;
यंत्रें तीं बनलीं असें मज दिसे, पोटाविणे ना सुचे
ज्ञाते हें करिती जगांत असलें! मूर्खा न तें कां रुचे! ९



[ ३ ]

# शिवजयंति श्लोक





शिवाजी, शिवाजी स्मरा वीर गाजी;
करीं खड्ग मोठा, बसायास वाजी;
भजे राष्ट्र-देवीस, गोब्राह्मणांतें;
असा शूर योद्धा, नमूं तत्पदांतें १

किती दुःख सोशी शिवाजी जगांत;
भजे हिंद-राष्ट्रा, मुखें त्यास गात;
कसें राष्ट्र हें होय लोकांत उच्च;
तया मानिती काय हो, आज तुच्छ २

सदा मानसीं राष्ट्र-निष्ठा जयाचा,
वदे राष्ट्र-काव्यें जयाची सुवाचा
सदा संगरीं यज्ञ केला जिवाचा
शिवाजी, शिवाजी वदे तूं त्रिवाचा ३

पराधीन हे आज झालों कितीक;
मिळे खावयाला न, घालाल भीक;
तसें धैर्य शौर्यादि गेलें, पळालें;
विचारें पहा, तेज सारें निवालें ४

जिथें वेद गाती पुराणें स्तवीती,
स्वभावें विरागी रणीं जे न भीती
अशी हिंद-देवी कशी हो, विटाळे
शिवाजीविणें आज बा, शून्य झाले ५

शिवाजी भजावा, शिवाजी स्तवावा,
स्वराष्ट्रामध्यें बा, शिवाजी दिसावा;
स्वबंधूसवें एक व्हावें जगांत;
स्मरा हिंद-देवी, खरी त्या शिवांत ६

असा पारशी, जैन, हिंदू, मराठे;
परी राष्ट्र--कार्यांत एकी रहाटे;
शिवाजीमध्यें भेद नाहीं कशाचा,
करी यज्ञ राष्ट्रीं सदा या जिवाचा ७

अशी राष्ट्र--गीता वदे सद्विचार,
धरावें मनीं आचरावे ससार;
शिवाजी--जयंतीस राष्ट्रा स्मरावें
"मरावें परी कीर्ति--रूपें उरावें" ८

# ३ सृष्टिविषयक भावना.



## (१)

## संक्रांतीचा तिळगूळ

श्लोक

संक्रांतिला रवि पहा, मकरास जाई,
पंचांग रूपक करी तिज नित्य गाई,
देती जनांस तिळगूळ; विशेष रूपः—
हृत्प्रेम दाविति असें प्रभुचें स्वरूप १

राष्ट्रोन्नती करितसे जनीं ऐक्यभाव
द्वेषामुळें त्यजिति लोक निसर्गभाव
देशांत ऐक्य करिती जन आज सारे
संक्रांति हीच गमते, तिळगूळ घ्या, रे २

बीजामधें तरु वसे, फल-पुष्प सारें
अव्यक्त व्यक्त करितो परमेश हा, रे,
सृष्टी सदैव रमते, नमते अजांत,
संक्रांति ही दिसतसे, बुध सांगतात, ३

आकाश गोल फिरतो रवि, चंद्र, तारे
कार्यांत मग्न अवघे, करि नित्य सारें

तेजें किती चमकती रवि-चंद्र पाहे
संक्रांति-शक्ति हृदयीं उमजून घ्या, हे ४

व्याघ्रादिकांस ‘ खल ’ बोलति, हा निसर्ग
सृष्टी सदैव धरिते, करिते विसर्ग;
ही प्रेरणा विभु करी, अथवा स्वतांची;
संक्रांति काय कथिते मज तूंच वाची ५

जीवांत जीव वसतो, निपजे, लयाला—
जातो, करी क्षणभरी स्थिरता मनाला,
साधू म्हणून करिती उपदेश गोड,
‘हिंसा--प्रधान’ जग हें तरि तसि सोड ६

शक्ति-प्रताप असती जगतांत ऐसे;
हे चालवी विभु, तयास अगम्य कैसे!
चित्तामधें ह्मणुनिया विभु नित्य गावा;
संक्रांतिचा खचित अर्थ मनांत ध्यावा, ७

शक्ती जगांत अधिभौतिक—दैविकादी;
नेत्रीं पहा हृदय--मंदिर--देव, वंदी,
तें प्रेम आज तिळगूळ कथी जनाला
येतों, नमस्कृति असो तुमच्या पदाला ८

# शिक्षक–कर्तव्य,



श्लोक

( २ )

प्रेरी प्रमेय गणितांतिल बुद्धिभूत;
सिद्धांत सत्य शिकवी; करि तत्त्व--भूत;
वर्षे गुरू सदुपदेश–रसांबुदांनीं
द्यावीं फळें मधुर सुंदर चित्तलतांनीं १

भाषा--नदी बहुत खोल, तिला न ठाव;
शिष्यास दे गुरु जगांतिल अर्थ--नाव:
नाना–रसांत रमवी कवि--कल्पनांच्या
नीती सदा शिकविते कवि--संत–वाचा २

ज्याची करी धवल--कीर्ति जगा चकीत;
त्यांच्या गुणीं रमवि शिक्षक बालचित्त,
राष्ट्राभिमान शिशु--चित्तिं सदैव ठेवी,
शौर्यास पाहुनि वरी पति भूमि--देवी ३

भूमीवरील कथितो नरदेव–कृत्य;
तारा--समूह करितो गगनांत नृत्य;
दावी अनेक -कृति देव अनंत–रूप
त्याच्या यशा टिकति काय अनाथ--भूप ४

उद्यान--चित्त करि सद्गुण--बीज लावी;
राखी, करी सदुपदेश, लता फुलावी;
घाली सुसंतवचनोदक योग्य वेळीं
देती फळें मधुर बालक--वृक्ष--वेली ५

धर्मांत नीति असते सुख होइ त्यांत;
ती पारमार्थिक लता सुकली वनांत;
घाली तिला गुरु सदोदित गोड पाणी;
ती दे खरें सुख वदे अशि संत--वाणी, ६

होतें असें सतत शिक्षण फार यत्नें,
बाळे तिथें निपजती बहु-मोल रत्नें,
तेथें विपत्ति समयास मिळे न थार,
लक्ष्मी उणें न पडुं दे शिरिं घेइ भार, ७

---

( ३ )

## पंडितास—श्लोक



बा, पंडिता, मधुर, शुद्ध, रसाळ वाणी;
मोही सदा जन- मना, तुज जोडि पाणी,
त्वां नामसार्थक जनीं कविराज केलें,

प्राचीन वाङ्मय तुझ्या वदनांत ठेलें, १

श्रीशारदा रमवि पंडित--पंत यांस,
लक्ष्मी--पदीं भजतसे परि पंत दास,
हा युक्तिवाद हृदयीं नच जाणिला रे.
तेणें तुला फसविलें मनिं जाण सारें २

लक्ष्मी वरी तुजसि बा, करिं राज्य येई,
सापत्न--भाव धरि चंचल, दुःख देई,
मोहें बुधांस भुलवी, धरि भिन्न--भाव
वेश्येपरी; डसतसे जशि थोर लाव ३

वारांगणेपरि जनीं नृप--पंत--नीती,
वेदांत 'मोह' कथितो अशि तत्त्व--रीती,
लक्ष्मी मुनि त्यजुनि बा, वनवास घेती,
माया--रमा नच अबाधित सौख्य देती. ४

श्रीसप्तशृंग[1]-कमला-चरणांस सेवीं,
लक्ष्मी-पदास भज रे, खरी तत्त्व-देवी,
ती सौख्य देइल अबाधित पंडितास,
येतो नमस्कृति पदा करि दीन दास ५

१ सप्तशृंग-सात इंद्रियें. सप्त ऋषयः [ इंद्रियें ] प्रतिहिताः शरीरे सप्त रक्षन्ति सद्धमप्रमादम् । यजुर्वेद स. ५५-३४

( ४ )

# सृष्टि-विकार



चैतन्य देइ जगतास रवि प्रकाशे;
धान्यादि पुष्ट करि सोम जसा विकाशे;
तारा-ग्रहादि गगनांत सतेज गोल,
त्यांना द्युति-ग्रहण हे करिती अमोल. १

लक्ष्मी गजांत असते कर जोडुनीया;
श्रीशारदा रमवि वैभव दावुनयिा;
भूते तशीं स्तविति एकमतें जयाला;
घोटें " शिकंदर-नशीब " नृपाल-माला. ! २

उद्यान-कुंज लतिका सुमनें विलासे,
हासे, तसें सुमन पंकज जों विकासे,
गातात कोकिल जिथे मधुर-स्वरानें
जातां वसंत विकृति स्वगृहा तया ने ३

पवन मधुर गातो वेणु-कंठ-स्वरानें;
तरु-वर-लतिका या गाति पक्षी-रवानें;
धवल-मधुर वारी निर्झरांतून गातें
विमल यश जयाचें ती स्थली नष्ट होतें ४

युवति कारिति लीला प्रेमभावें पतीशीं;
शिशु-मुख-कमलाचें हास्य मोही जनीशी;
गुरु-वर-चरणांची शिष्य सेवा करीती;
दिसति न नगरें तीं तक्षशीलादि अंतीं ५

श्रीबौद्ध, कृष्ण, हृदयांतर-काम-जेता;
अद्वैत शंकर वदे बुध तत्व-वेत्ता
शोपेनहाउर, महंमद, खिस्तराज;
तत्वांतरें असति भिन्न जगांत आज ६

कवि-वर-हृदयाची वाहिली स्नेह-गंगा
रसिक करुनि तेथें स्नान शोधी चिदंगा
मुनिवर रमले हो सच्चिदानंद योगी,
विकृति अवदशा ही त्या स्थला आज भोगी ७

हरिति धन गिरीचें या नद्या सर्व कांहीं;
हळु हळु मग जाती अब्धिला गात पाही;
रवि-किरण-तपानें मेघ होती नभांत,
वसुमतिवर धारा-रूप त्या वर्षतात ८

सृष्टी अशी विकसते, विटते सदैव;
दृष्टीस जें दिसतसे परि भिन्न दैव,
सृष्टी-विकार करिती उपयुक्त तीस,
" दुःखामधे सुख खरें दिसतें कवीस " ९



[ ९ ]

# जीवितौघ–तरंग श्लोक



[ १ ]

आईच्या उदरांतुनी उपजलों, मांडीवरी खेळलों,
प्राशी प्रेम-पया मुके मटमटा सेवून मी हांसलों,
गाई गोड गुणास माय हृदया, कां पाळण्या हालवी,
मातृ-स्नेहसरि तरंग-कविता चंद्रामृता कालवी, १

बाळांची वदनें सुरम्य सुमनें सद्भावना डोलती.
संसारीं गृह-रत्न बाल ह्मणती रत्नाकरा निंदिती
वाणी मोहक बोबडी विलसते श्रीशारदामंदिर,
गेलें सप्तक, मौंज-बंधन-विधी विद्यार्जनीं सादर २

[ २ ]

मारी हाक जनी, तिला विसरलों खेळामधे गुंगलों,
नाना खेळ मुलांमधे करुनि मी क्रीडांगणीं रंगलों,
अभ्यासीं रमलों कधीं, उतरलों साऱ्या परीक्षांत मी,
आई-बाप तसे गुरूपकृतिनें झालों कृती सत्तमी. ३

[ ३ ]

गेले सप्तक दोन, तीन पुढती भार्या गुणी पावली,
संसारीं रमलों, जना विसरलों, चाले तिच्या पावलीं,

भार्या रूपवती गृहांत विलसे दाक्षिण्य शिक्षंतलें,
बाळें गोंडस नीति-बुद्धि-सुमनें चिह्निय कीं पातलें. ४

आर्यावर्त पहा, अफाट दिसतो जो पर्वतीं वेष्टिला;
नैसर्गे नटल्या नद्या विलसल्या ऐश्वर्य कीं पावला;
सूर्याचा कर मस्तकावर पडे; योगी, कवी, तापसी,
राजे थोर पराक्रमी उगवले ! ये दुर्दशा कां अशी ! ! ५

राष्ट्राची प्रगती दिसे अवनती, हें अंतरीं शोधिलें !
चित्ताला न कळे खरें ह्मणुनिया शिष्टांस आराधिलें
राष्ट्राचीं शकलें ‘ दुही ’ अवदशा पाडी कसें भारतीं
स्वातंत्र्य-प्रतिभा-सतीस भजतों ओवाळुनी आरती ६

[ ४ ]

देशोद्धार-समाज-काज करितों, रात्रंदिनीं जागतों;
लोकांचे अपवाद-शस्त्र पडतां सोसून मी वागतों
सांगे जें इतिहास सूक्ष्म-मतिनें ग्यां आदरें जाणलें
केलें योग्य मला जनांस रुचल ‘स्वातंत्र्य’ हें आपलें ७

राष्ट्रैक्य-प्रातिमा-सतीस हृदयीं नाहीं जनीं पूजिलें
गीता-वेद-विचार-संत-कवनीं मूर्तीस आराधिलें
यंत्रें मानव-शक्ति पूर्ण हरितीं, व्यापार-धंदे किती
चातुर्वर्ण्य-कथा वृथा कथियल्या, ग्रंथांतरीं भासती ८

गीता-भागवतांत तत्त्व कथिलें तें ‘ नेति† ’ नें भासलें
राष्ट्रैक्यांत रुजेल तें जनपदीं गांधी-महात्म्यांतलें
नामें जें ‘ सहकारिताऽसहकृती ’ ‘ सत्याग्रहादी ’ वर
तत्त्वानें हृदयीं जनास रुचती, कार्यक्षमीं दुर्धर ९

जाति-व्यक्तिस धर्म बंधन-विधी चाले कसा या युगीं
पाश्चात्य-प्रकृती विरोध करितां आली दशा वाउगी
नाहीं ज्ञान जना स्वराज्य-विधिचें आत्मैव शत्रू जना
गीता-वेद जनास तत्त्व कथिती ‘ अद्वैत ’ पाहे मना १०

[ ९ ]

ऐसा अर्थ शतीं विचार करितां चिच्छक्ति कोमावली
बुद्धि-प्रेरक-तारक-प्रभु-पदीं हृन्मंदिरीं मावली
शांतीचें स्थल ‘ सच्चिदात्म ’ दिसतें, व्यापी जगा अंतरीं
साष्टांगें नमितों पदास विभुच्या हो वास हृन्मंदिरीं ११



---

† नेति was the best description, the authers of the उपनिषद were able to find ब्रह्मन्. Non-Co-operation is the nation's notice that is no longer satisfied to be in tutelage. Re-jection is as much an ideal as the acceptance of a thing.

**Young India.**
**1-6-21.**

( ६ )

# संक्रांतचा तिळगूळ



## प्रेम श्लोक

प्रेमें घ्यावें तिळगुळ सख्या, प्रेम हें वाढवावें
या प्रेमानें भुवन सगळें, व्यापिलें तें पहावें
माता पुत्रीं, पतिवारि सती, भक्त देवावरी तो–
ठेवी प्रेमा; स्थितिपरि जनीं भिन्नरूपा धरीतो. १

या प्रेमानें रवि नभिं चढे, गाति तत्कीर्ति पक्षी,
येती पुष्पें तरुवरि, लता प्रेम-वृक्षास लक्षी;
हृत्तापाते शमवि किरणें चंद्र तो प्रेम दावी;
गंगा धावे गिरिवरुनि कीं सिंधुची भेट घ्यावी. २

ज्ञात्याच्या हृदयांतुनी किरण हे प्रेमें जनीं धावती
अज्ञांच्या हृदयांतरांत शिरती, अज्ञान कीं जाळती
सत्याचा पथ दाविती सरळ जो लागी मनाला सदा
प्रेमावीण असे कसेच घडतें ऐश्वर्य कीं संपदा ३

मातेचें मन हें सुतावरि असे, पान्हा फुटे कीं स्तनीं
भोगी दुःख जनीं, कधीं न विटते कल्याण चिंती मनीं
आहे ‘ मातृमुखी सदा सुखि ’ अशी लोकामधें जी म्हण
माता होय घरांत शिक्षक खरा होतें न प्रेमाविण; ४

साध्वीचें मन हें पतीवरि असे, तैसे गृहीं सर्वदा;
ज्ञाते हें " गृहिणी गृहं " वदति कीं शांती वसे संपदा;
राष्ट्राच्या उदयास कारण असे 'शांती' 'गृहीं शिक्षण;'
पेरावें हृदयांत बीज असलें जें प्रीतिचें लक्षण, ५

देवांचें हें श्रुति कथितसे सच्चिदानंदरूप;
आनंदाचें पारि धरितसे प्रेम भिन्नस्वरूप;
ऐसा आहे अवयव पहा, प्रेम हा ईश्वराचा,
संक्रांतीचा तिळगुळ खरा जागवो अर्थ साचा ६

---

[ ७ ]

## ब्राह्मण. ( आर्या )



ब्राह्मण म्हणवायाला मनांत मज आज वाटते लाज;
सूर्याच्या तेजाचें कधीं तरि करील काजवा काज १

वल्कल-वस्त्रें, माला रुद्राक्षाच्यां शिरीं जटाभार;
शय्या असे तृणाची निर्जन-वनवास कीं फलाहार. २

व्याकरण, न्याय तशा मीमांसा, ब्रह्मसूत्र गा, पाहे,
हृदयांतरास शोधुनि विचार-गंगा मनांत कीं वाहे ३

रात्रंदिन शास्त्राचा करुनी त्यांनीं विचार-साचार,
केले ग्रंथ, तयांनीं तत्त्व-विचारींहि तोषले फार ४

पड्रिपुला कधि न मिळे विज्ञान-विचार-मानसीं स्थान
चारी आश्रम पाळिति, तत्वीं धरिती सदैव ते ध्यान. ५

योगी योगे मिळविति परमेश-स्थान सौख्य दायक जें
आयुष्य फार वाढे, शांत असति सम-गुण-तम-सत्व-रजें ६

सगळया शास्त्रामध्यें पूर्णत्वीं पूर्ण काल घालविला
ज्यांचा कीर्तिध्वज हा साऱ्या सृष्टींत काय फडफडला. ७

शारीर-मानस-सुखीं ज्यानीं अल्पहि न ठेविलें लक्ष;
अध्यात्मीं सुविचारीं ज्यांचे मानस असे सदा दक्ष ८

वाल्मीकि, वसिष्ठ-मुनी पाणिनि वाग्भट्ट कालिदास तसे
अन्य तसे धन्य पुरुष ! ज्यांचा बहु-कीर्ति-रूप-काय-नसे ९

एकांत जीं ठिकाणें, गंगा-गोदा, अनेक गिरि असती
तीं त्यांना आवडती, असती चिन्हें, तयास दाखविती १०
अध्ययनाध्यापन हीं पट्कर्मे समजुनी सदा करिती;
ज्ञानोदधि दुस्तर जरि मति-नौकेनें क्षणैक ते तरती ११
शतकें अनेक झालीं परि ज्यांचा धर्म आजवर टिकला;
त्यांचे वंशज ज्यांनीं पोटाला सर्व देह हा विकला १२

भांडार असें सगळें गीर्वाणीं त्यास आज बा मुकलों
पोटार्थी परभाषा शिकतों, स्वत्वाभिमान हा चुकलों १३

ऐशी अमची जननी तिजसी आह्मी अनोळखी झालों
आह्मा काय ह्मणावें ! तद्दुर्शी व्यर्थ आज हो, आलों १४

या चिद्भूवर वर्षे पर-भाषा-नीति-धर्म पर्जन्य
संस्कार-वश-मनानें आत्मपर पहावया न हो, धन्य १५

आप्त-गणीं नावड ज्या, गिरिकंदर-वास गोड ज्या लागे
सर्वा भूतीं एकाचि स्वपर न ज्यांच्या मनीं कधीं वागे १६

अंत:करण कसें तें, आत्मा अक्षय्य जन्म हा घेतो;
प्रत्यक्ष सिद्ध केलें, ज्ञानाक्षांनीं विचार पाहे तो १७

योगें तात्त्विक समजे, ब्रह्मीं आत्मा सुखी सदा राहे,
प्राणायाम तयाची खूण; न कोणी विचार हा पाहे १८

आह्मीं परतंत्र किती माहित नसती स्वधर्म-तत्त्वें हो
मंत्र नये आह्माला, अर्थी जागावयास इच्छा हो १९

मुंज असे ही अपली अध्ययनाचीच पायरी पहिली
व्यवहार केवळ असे, खर्चाची प्रथम पायरी धरिली २०

राम पराक्रम बहु परि वाल्मीकानें जनांत वर्णियला
अर्जुन तैसा कर्णहि, कवि-वचनीं सांग तो कसा गमला २१

दुर्योधनादि कौरव, ते अर्जुन, भमि, धर्म, द्रौपदि, या
कोणी वर्णन करुनी जन-योग्यायोग्य आणिले पदि या २२

कार्य-गुरुत्वाकर्षण-भूभ्रमण, अयंत्र शोध जे करिती
कितिकांना ते ठाउक "भास्कर" ते "आर्यभट्ट या जगतीं" २३

इंद्रिय-विषय-मनाचें दमन कारिति, हेच यज्ञ हो, ज्यांचे
श्रेष्ठतमसुखासाठीं यत्न, कारिति, सार्थक नर-जन्माचें २४

पर-धर्मी पारि शिकुनी संस्कृत ते धर्म-पुस्तकें पढती
जें योग्य दिसे घेती तीं तीं तत्त्वें सदैव आचरती २५

सावध व्हा, सावध व्हा, स्वधर्म बरवा, तया न सोडा हो
ऐसे परके वदती अज्ञान-पटल न दूर तेव्हां हो २६

गोत्र-प्रवर न ठाउक, ऐसे आह्मी कितीतरी आहों
पूर्वज-कृति काशि आहे ! परोपदेशें तरी तिला पाहों २७

ब्राह्मण-वंशज आम्ही ह्मणवाया काय वाटतें सार
शूद्रापरि शूद्र असूं तद्वंशाचा असोच धिःकार २८



# ४ मुलांस उपदेश



शिशुत्वेऽभ्यस्तविद्यानाम्।···· ····

कालिदास र. १--८

## [ १ ] वडिलांचा मान

मानावे देव तुवां घरांत जीं थोर माणसें असती
त्यांची पूजा ऐशी मानावे आपणास जें वदती १

गुरु, बंधु, पिता, माता, यांची आज्ञा सदैव मानावी
ते तुज जी वदती ती हितकर गोष्टहि मनांत ठेवावी २

त्यावांचुनि जगती या हितकर मार्ग तुज दाविना अन्य
कारि तूं विचार पुरता कोमल अपल्या मनास जो मान्य ३

बाळपणीं पोटींच्या दुग्धानें रक्षि माय जी तुजशी
दुखतां खुपतां अतिशय तळमळते, देह झिजवि फार कशी ४

जें कांहीं आवडतें पुरवी माय तुज ती स्वकष्टानें
जो मानि न मातेला जन्म फुकट घेतला सुदुष्टानें ५

उपकार मनुष्यावर नाहीं मातेसमान कोणाचा
कल्याणाच्या शब्दा फार सदा चालते जिची वाचा ६

## (२) थोर पुरुष

गुरुचरणीं लक्ष तुझें गुंतावें ही सदा मनीं आस
विद्या तुज येई मग, विद्यानंद देइ अंतरीं वास ७

मातापितरें जन्मा देती सद्गुरु सुमार्ग तो दावी
सन्मार्गानें महती हो सद्गुरु--भक्ति फार जोडावी ८

सद्गुरुनें सत्य जगीं काय असे आपणास तें कळतें
सार्थक नरजन्माचें जें सद्गुरुवीण तें न आढळतें ९

यासाठीं सद्गुरुशीं नम्र सदा होउनी मनीं वागे
लक्ष तुझें स्थिर ठेवी मग तो तुज सत्य तें सदा सांगे १०

ज्ञाते मानव वेळीं जें जें वदतील तें मनीं ठेवीं
तैसें मग वागावें कृपण जशि जपून ठेवितो ठेवी ११

झाले जे आजवरी थोर पुरुष वागले जगीं कैसें
पाहुनि चरित्र त्यांचें योग्य गुणा घेइ वाग तूं तैसें १२

इतिहासामध्यें तुज मंत्री, कवि, साधु, शूर जे राजे
योद्धे आढळती बहु, ज्यांची अत्यंत कीर्ति रे गाजे १३

देशासाठीं तैशी धर्मासाठीं बळीं शरीरें हीं
दिधलीं ज्यांनीं त्यांचे उपकार जसे दुजे तसे नाहीं १४

श्रीरामदास शिवनृप यांचे उपकार फार या देशीं
धर्माला, राज्याला शरीर यांनीं दिलें, न आशेशी १५

## [ ३ ] वेळ

प्रातःकाळीं लवकर उठुनी शौचास जाउनी यावें
करचरणमुखा धुउनी स्वच्छ सदोदित तयांस ठेवावें १६

वेळांत वेळ उत्तम अभ्यासाला अशी नसे दुसरी
ह्मणुनी झडकर जाई शाळेला तूं न आळसास धरी १७

नियमितपणा मनाला सुखकारक योग्य वाटतो पाहे
देह तसें मन यांना सदोदित पवित्र ठेवुनी राहे १८

वेळासमान किंमत मनुजास नसे जगांत दुसऱ्याची
आयुष्य फुकट जावो न गोष्ट ही सांगतों तुज बऱ्याची १९

पुष्कळ शिकावयाचें आहे आयुष्य काल हा थोडा
तो वेळ फुकट जावा ज्यामाजीं काम तें तुह्मी सोडा २०

## [ ४ ] उद्योग

उद्योग सतत व्हावा उद्योगानें मनुष्य उदयाला
येतो, नाना फडनिस, कवि मोरोपंत, हैदरहि आला २१

मुंगी सदा श्रम करी पर्जन्यीं सुखसमय तिचा जातो

माशी चैना कारिते म्हणुनी पर्जन्यकाळ ती खातो २२

जन्मापासुनि येते माशाला पोहणें, न तो शिकतो
तैसें पक्ष्या उडणें, घरटें त्याचें सुरेख तो करितो २३

भक्ष्यासाठीं वाघा तीव्र नखें, दांत, देव हा देतो
संरक्षण गाईचें व्हावें शिंगें तिला शिरीं दे तो २४

दुबळे जे हरिण, ससे त्या डोळे, कान, तीक्ष्ण चंचलता—
दिधलीं परमेशानें, न धरी प्राणी तयांस जो भलता २५

सगळ्या या प्राण्यांना त्यांच्यापुरतें तयांस तो देतो
त्यांचा देह तयांला पुरता संरक्षणा सदा होतो २६

ऐसें न मनुष्याला अयतें मिळतें कधी श्रम करीन
खाया भाकर, जाडें धोतर, पडतात कष्ट, जरी हीन २७

वस्त्रें, शस्त्रें, पात्रें, सदनें इत्यादि कष्टसाध्य नरा
यासाठीं उद्योगी व्हावें, प्रभुचा असाच हेतु खरा २८

उद्योगासाठीं मग देवानें काय जास्त तें दिधलें
करुनी विचार बघतां तत्र चित्तीं सांग काय आढळलें! २९

मननाची शक्ति दिली, दुसऱ्यापेक्षां नरास हें जास्ती
पथ्यापथ्य विचारा नर चित्तांवाचुनी नसे वस्ती ३०

सामर्थ्य असेल जसें काम करावें तयास जाणून
मुंगी डोंगर उचली गोष्ट अशी घ्याल काय समजून ३१

## ( ५ ) प्रीति

भाऊ, बहीण, यांशीं प्रेमानें वाग सर्वदा बा ,रे
झाडामध्यें असतो जो त्या वृक्षा न लागतें वारें २३

आप्त तसें मित्रहि जे, प्रेम तयांशी सदैव ठेवावें
संकट आलें असतां, त्यांच्या दुःखास साह्य तूं व्हावें ३३

येशिल तूं अन्याच्या जर उपयोगा, तरीच ते तुझिया
येतिल उपयोगाला, सन्मार्गे कीर्ति हो जनीं तुझि या ३४

व्हावी सदा सुसंगति, तेणें वाढे सुकीर्ति, सुख होतें
हातास वास लागे, पुष्प सुवासी करांत घे जो तें ३५

व्यंग जयाचें इंद्रिय, त्यांना भिक्षा अवश्य घालावी
निरुपाय होउनी ते मागति भिक्षा न दोष त्यां लावी ३६

## ( ६ ] सुविचार

ज्या वाणीनें तोषे जनमन हितकर अशीच बोलावी
नाहीं तरि मौन बरें, ही गोष्ट सतत मनांत ठेवावी ३७

कानांनीं ऐकावें खोटें तैसें खरें विचारानें—

टरवावे, एकाकी बोलावें ना कधींच रागानें ३८

जर अवगुण कोणाचा नजरेस तुझ्या कुठें कधीं आला
त्याला न ठेवि नांवें, पाहुनि हासूं नको कधीं त्याला ३९

ही जात चांगली, ही वाईट, असें मनीं न आणावें
जात दगड रत्नाची, मग त्याला श्रेष्ठ काय मानावें ! ४०

ज्याला त्याला शोभा स्वगुणांनीं येतसे, न जातीनें
चोखामेळा, तुकया, तशी अहिल्या न झाकिलें तीनें ४१

देशाभिमान तैसा सर्वा धर्माभिमानही व्हावा
पोकळ डौल नसावा, कर्तव्यानें जनांत आणावा ४२

## ७ कुविचार

आणि न विचार ऐसा दुसऱ्याचा ज्यांत होतसे तोटा
जन पाहे न मनाला, परंतु परमेश जाणतो खोटा ४३

कोमल तुझिया हृदया रागानें होय बाळ बहु पीडा
सोडी सोडी त्याला, आनंदाशीं सुखें करी क्रीडा ४४

बहु वाटे खेळावें, परंतु त्यांतून मानसा ओढी
तुज वाटे प्रथम कठिण, परि परिणामीं असें पहा, गोडी ४५

जों जों वय हें वाढे तों तों कुविचार अंतरा ओढी

धरुनी निश्चय त्याला मनांतुनी दूर नेउनी सोडी ४६

गर्व किमपिहि नसावा आंगीं गुण फार चांगले असले
केतकि--पुष्प सुवासा कथा म्हणुनी कधि न सांगण्या बसले ४७

विद्याभ्यासीं रत हो, कुकल्पनेला न ठाव दे बाळा
दुग्धीं पडला जो कां तेलाचा थेंब, नाशि तो त्याला ४८

या तोंडानें वाणी अपवित्र अशी कधीं न काढावी
होई दुःख दुज्याला, ऐशी कृति सर्वथैव टाकावी ४९

दुखवी कदापि न दुज्या हृदयी वाईट हेतु आणोनी
अपवित्र पदार्थ असे जो, त्यास कधीं न पाहतो ज्ञानी ५०

एकाकी कोणाची कधीहि आपण करूं नये थट्टा
वाटे प्रथम बरी ती, परंतु थोरास आणिते बट्टा ५१

जिन्नस नवा पहातां, घ्यावासा वाटतो कसाहि असो
उपयोग नसे ज्याचा तो घेणें व्यर्थ, हें मनांत वसो ५२

कोणा मति, कोणा बळ, गायन सामर्थ्य, जास्त हीं दिधलीं
हेवा तूं न करावा त्यांचा, विहिरीस ना टिके बुधली ५३

ज्यावेळीं जें करिसी त्यावेळीं त्यांत लक्ष ठेवावें
इकडे तिकडे जातें हें मन ह्मणुनी तयास वळवावें ५४

परधर्मास न नांवें ठेवावीं, देव तूं न निंदावें
ज्यारूपानें हृदया आवडतो देव त्यास वंदावें ५५

वस्त्रें साधीं घ्यावीं, डौल नसावा कशांत गर्वाचा
सहवास मनुष्याला आवडतो गाइचा, न इतरांचा ५६

कारण नसतां वाणी तूं कोणाशीं कधीं न खर्चावी
वाणीपेक्षां कृतिची किंमत लोकांत जास्त समजावी ५७

## ( ८ ) अवलोकन

फार चमत्कारानें हें जग भरलें असे, मुला पाहे
जितकें पाहासि तितकें नूतन इच्छा कधीं पुरी आहे ! ५८

पर्जन्यकाळ येतो तेव्हां भू होतसे कशी हिरवी
वाटे हिरव्या वस्त्रा नेसुनि देवयश भूमि ही मिरवी ५९

रात्रीं भेटायाला हे मेघ तिला धुकें बनुनि येती
सूर्योदय होता ते गगनस्थानीं फिरूनिया जाती ६०

लक्ष क्षणभर दे तूं औषधि पुष्पफलयुक्त या असती
स्वच्छोदक वाहतसे, प्राणी यांत किति खेळ हे करती ६१

रात्री चंद्र सुखाला देतो होतो कितीक आनंद
लक्षावधि ताऱ्यांना पाहुनि आनंद हो, जरी मंद ६२

पृथ्वी जलचर, खेचर, भूचर यांनींच व्यापली आहे
कैसें रक्षण होतें, त्यांचें कौशल्य काय, हें पाहे ६३

घर गोगल-गाईला पाहे परमेश्वरें कसें दिधलें
प्राणी कौशल्यानें रक्षण व्हावें ह्मणून हे भरले ६४

पृथ्वीवर कोठें जीं क्षेत्रें, मोठीं स्थळें, नद्या, गांवें—
आहेत, तसें कोठें विशेष असतें, तयास शोधावें ६५

ऐशा या नानाविध गोष्टीनें तोषित मन ठेवावें
यांचा चालक ऐसा जो परमेश्वर तयास वंदावें ६६

हे जग शाळा आहे, त्यांतील पदार्थ ही तुझी विद्या
शिक्षक मनास करुनी देवाची जाण गारुडी विद्या ६७

## ( ९ ) कर्तव्य कर्म

ज्यांची झाली विद्या त्यांचें कर्तव्य वेगळें आहे
कर्तव्य हें मुलांना विद्या, न दुजें जगीं असें पाहे ६८

संध्यास्नानादिक जीं कर्तव्यें रोजचीं मुला असती
तीं नेहमीं करावीं आळस टाकोन, साधु हें वदती ६९

मोटा लहान तैसा श्रीमंत गरीब पाहुणा आला
सत्कारावें त्याला, घालविना व्यर्थ काळ जो त्याला ७०

गुरु सांगतील लवकर समजेना तें कधीं जरी तुजला
फिरुनी त्यास पुसावें, विषय कठिण तो जरी तुला असला ७१

औषध घेतां घेतां रोगी माणुस जसा बरा होतो
वाचुनि वाचुनि होतो विद्यार्थी चांगला असा हो तो ७२

समजायाला जातें प्रथम कठिण समजतांच आनंद–
होतो हुशार तेथें जो लावी लक्ष तो असो मंद ७३

निजते वेळीं ठेवी हिशोब दिवसांत होति जीं कामें
भक्तीनें मग ध्यावीं देवाचीं, साधुची तशीं नामें ७४

वाणी, कृति, मन, यांचें साम्य सदा ठेव, साधुच्या रीती
असती ऐशाच सदा, चरित्र त्यांचें असो मुला चित्ती ७५

वय, धन, विद्या यांनीं जे मोठे त्यांस मान तूं द्यावा
कृति, मन वाणी यांनीं त्यांचा अपमान ना कधी व्हावा ७६

हृदयीं विचार, विद्या, सुनीति, सुप्रीति, भीति ठेवावी
त्यायोगानें मन हें सुविचाराचा सदैव ठेवा वी ७७

## ( १० ) व्यवस्थितपणा

काय बरें असतें हो, उपवन, किंवा अरण्य, यांमाजी
जेथें जेथें असतो व्यवस्थितपणा मनास तो राजी ७८

अंगावरचीं वस्त्रें स्वच्छ असावीं, न फाटकी ल्यावीं

नरिबा असे शिवात्री कामाचीं लाज काय वाटावी ७९

## ( ११ ) प्रसंगावधान

वेळीं सावध असणें तया प्रसंगावधान जन ह्मणती
हा गुण नरा असावा, यावाचूनी नसे जगीं महती ८०

संकट आलें असतां त्यावेळीं धैर्य तूं न सोडावें
संकट दूर करूनी युक्तीनें मग यशास जोडावें ८१

## [ १२ ] अन्न

जे जें मिळेल खाया आनंदानेंच अन्न तें खावें
पशुपक्ष्यादिक यांना मिळतें आनंद त्यांत शोधावें ८२

बहु गोड अन्न मिळतां, खावें थोडें न फार सुख देतें
मूळ अधाशी असतें जें, सर्वांच्या मना न सुख दे तें ८३

वाटे बाळा तुजला खावा खाऊ, जयांत बहु गोडी
जितकी पुरवी आशा, तितकी न पुरेच, होतसे थोडी ८४

## [ १३ ] कसरत

संपत्तिमधें मोठी शरीर संपत्ति तीस सांभाळी
विद्याधनादिकांना कारण जी, राक्षि योग्य ती काळीं ८५

अभ्यासें मति वाढे तैसें अपलें शरीर कसरतिनें
कसरत सदा असावी रोगाची दूर होइ कसर तिनें ८६

## (१४) परमेश्वर भक्ति

ज्याच्या चरण-कृपेनें नरजन्म मिळे तयास सद्भावें
प्रातःकाळीं तैसें संध्याकाळीं प्रभूस वंदावें ८७

सृष्टीमध्यें कार्ये आहेत अनेक काय वर्णावी
लेशभर न्यून नसे ऐशा प्रभुचीच कीर्ति तूं गावी ८८

देवा, अनाथ आहें तुजवाचोनी नसे मला अन्य
मजला सुबुद्धि द्यावी बालक मी अज्ञ हो तुला मान्य ८९

वृक्षाला मेघानें घालिसि पाणी तयास रक्षाया
मग माझ्या बुद्धीला सुविचारें राखिसी न कां आर्या ! ९०

अज्ञाला मजला तव कैसें सामर्थ्य हें मनांत नये
म्हणुनी त्वां शिकवावें, 'अज्ञ असे' हें मनांत आणुं नये ९१

सत्यसुमार्गीं शास्त्रीं मन हें माझें सदैव जागावें
हें मन निर्मल होवो, यानें तुज, साधुला सदा गावें ९२

मी शिकतों कांहीं जें, माझ्या हृदयामधेंच वागावें

मति दे ऐशी मजला त्यायोगें मी जनांत वागावें १३

## ( १५ ) सारांश

ठेवि सदा वडिलांचा मान नमा थोर साधु पुरुषांचा
आयुष्य फार थोडें ह्मणुनी जावो न वेळ मोलाचा १४

हें जग सौंदर्यानें फारच भरलें असे सदा, पाहे
परमेश्वरमति कैशी यावरुनी स्पष्ट अंतरी आहे १५

कर्तव्य कर्म विद्या यावाचूनी नसे दुजें कांहीं
कुविचार मनी येतां तू त्याची भाजुनी करी लाही १६

आप्तावर, मित्रावर, दीनावर, फार भक्ति ठेवावी
उद्योगी त्वां व्हावें, त्यायोगानें सुकीर्तिही व्हावी १७

आपण व्यवस्थितपणा सर्वांमध्यें सुखार्थ ठेवावा
सांगितल्या गोष्टींचा मनी धरुनि फायदा तुवा घ्यावा १८

कसरत सदा करावी मनीं प्रसंगावधान ठेवावें
खावें मग बेतानें, परमेश्वर भक्तिला सदा गावें १९

जैशी बुद्धि असावी, तैशीच सुनीति आपणा व्हावी
ह्मणुनि मनोनिग्रह ही तरवार सतत तयार ठेवावी १००

एणपरि वागे जो पुष्पासम तो सतत शिरीं शोभे
त्याच्या संगतिला मग विद्यार्थ्यांचा समूह हा लोभे १०१

# प्रस्तावना



रा. गजानन गोपाळ जोशी, पेन्शनर स्कूलमास्तर, यांनीं केलेलें बृहदारण्यकोपनिषदाच्या चौथ्या अध्यायांतील दोन ते पांच ब्राह्मणांचें मराठी रूपांतर पाहिलें. उपनिषदांचें महत्त्व जगाच्या शास्त्रीय वाङ्मयांत फारच मोठें आहे. पूर्वमीमांसा ऊर्फ कर्ममीमांसा उत्तरमीमांसा ऊर्फ ( अपरं ) ब्रह्ममीमांसा, न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, हीं सहा तत्त्वान्वेषी धार्मिक दर्शनें अगर शास्त्रें उपनिषदांवरच उभारलीं आहेत. पैकीं उत्तरमीमांसा ऊर्फ [ अपरं ] ब्रह्ममीमांसा - यासच वेदांत अशी संज्ञा आहे--हेंच शास्त्र लोकांत विशेष फैलावलें. या वेदांतांतही द्वैत, अद्वैत असे भेद असून अद्वैतांत देखील केवलाद्वैत, विशिष्टाद्वैत, द्वैताद्वैत, व शुद्धाद्वैत असे उपभेद आहेत. या सर्व शास्त्रांचीं, व त्यांच्या भेदोपभेदाचीं कांहीं प्रमुख तत्त्वें उपनिषदांत सांपडतात. फार काय ! पण उपनिषदेंही जगाच्या आदि तत्त्वाचीं व तत्संबद्ध स्वतंत्रपणें व सर्वांगीण विचार करणारीं असल्यामुळें, बौद्ध, जैन, वगैरे अवैदिक अगर पाखांडी धर्मपंथांचींही कांहीं तत्वें ह्यांत आढळतात. किंबहुना जगांतील सर्व प्रकारचें तत्वज्ञान थोड्या फार प्रमाणानें उपनिषदांत ग्रथित झालें आहे यामुळें उपनिषदांचें महत्व फार मोठें आहे !

पण याच कारणामुळें उपनिषदांचा अर्थ लावण्यांतही

कित्येक प्रसंगीं बरीच तारंबळ उडते. उपनिषदें हीं स्वतां एक प्रकारचा अव्यवस्थित " सर्व दर्शनसंग्रहच " असल्यामुळें अथपासून इतीपर्यंत प्रत्येक उपनिषदांत वेदांताच्या कोणत्या तरी एका विशिष्ट भेदाचें अगर उपभेदाचेंच केवळ उपपादन सरळपणानें आढळत नाहीं. किंबहुना तसें तें आढळतें तर वेदांताचे हे सर्व भेदोपभेद मुळींच अस्तित्वांतच आले नसते. तथापि वेदांताच्या या सर्व भेदोपभेदाच्या मुख्य प्रवर्तक आचार्यांनीं, ही गोष्ट विसरून व आपलें विशिष्ट मतच उपनिषदांत सरळपणानें सांगितलें आहे. असा ग्रह करून घेऊन त्या दिशेनें आपल्या मतांशीं विरुद्ध असलेल्या उपनिषद्वचनांचा कसातरी ओढून ताणून अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. द्वैतमतवादी मध्वाचार्य, व अद्वैतमतवादी इतर आचार्य [ ह्मणजे केवलाद्वैतवादी शंकराचार्य, विशिष्टाद्वैतवादी रामानुजाचार्य, द्वैताद्वैतवादी निंबार्काचार्य, व शुद्धाद्वैतवादी वल्लभाचार्य ] या सर्व आचार्यांनी ( फक्त आपलें मत असंदिग्ध व सरळ भाषेंत उपनिषदांत सांगीतलें आहे असा ग्रह केल्यानें ) कित्येक ठिकाणीं ओढाताण करून उपनिषद्वचनाचा आपल्याला अनुकूल अर्थ कसातरी लावावा लागला आहे! तथापि त्यांतल्या त्यांत कमी ओढाताणीचा व ह्मणूनच जास्तींत जास्त ग्राह्य असा उपनिषद्वचनांचा अर्थ केवलाद्वैतवादी शंकराचार्य यांनींच लाविला असल्यानें, व प्रस्थानत्रयीवरील आणि विशेषतः ब्रह्मसूत्रावरील त्यांच्या भाष्यांतील युक्तिवाद बिनतोड असल्यानें त्यांचेंच केवलाद्वैत प्रतिपादक मत सर्वमान्य अगर बहुमान्य झालें आहे. रा. गजाननरावांनींही या

केवलाद्वैताच्याच अनुरोधानें प्रस्तुतच्या मूळ संस्कृत उपनिषद्भागाचें मराठींत रूपांतर केलें आहे.

मूळ संस्कृताचें हें शब्दशः रूपांतर नाहीं, तथापि मूळ गद्यांतले बहुतेक सर्व मुख्य विचार या पद्यात्मक रूपांतरांत उतरविण्याचा रा. गजाननरावांनीं प्रयत्न केला आहे, या प्रयत्नांत कित्येक ठिकाणीं कल्पनांचा संकोच केल्यामुळें, पद्यरचना जरासी क्लिष्ट झाली आहे. व त्यामुळें अर्थबोध तितकासा स्पष्टतेनें होत नाहीं. अर्थबोधासाठीं पद्यांची संख्या थोडीशी वाढवून रा. गजाननरावांनीं सर्व कल्पना सविस्तर दिल्या असत्या तर तें जास्त चांगलें झालें असतें. तथापि आहे या स्थितींतही थोड्याशा प्रयत्नानें पद्यांचा अर्थ समजण्यास फारसें कठीण जात नाहीं. एकंदरीनें हा प्रयत्न रा. गजाननरावांस बरा साधला आहे, असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं.

एच्. पी. टी. कॉलेज. }
१।११।३०

**ना. ह. पुंरदरे एम् ए.**
संस्कृत प्रोफेसर
**नाशिक.**

'**पद्यपुष्पहार**' पुस्तकाच्या १ ल्या भागांत "**ईश व केन**", याच पुस्तकाच्या २ ऱ्या भागांत 'कठ', तिसऱ्या भागांत 'मुंडक", अशा चार मंत्रोपनिषदांचीं रूपांतरें वाचकांपुढें आलीं आहेत. केसरी ता. ११-१-३० "मुंडकोपनिषदाचें भाषांतर सुबोध उतरलें आहे." विविधवृत्त ता. ४-११-२८ "कठोपनिषदाचें भाषांतर वाचनीय आहे. हीं उपनिषदें मंत्रबद्ध आहेत. प्रत्येक मंत्राचा भावार्थ प्रत्येक श्लोकांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला आहे हें वरील केसरी व विविधवृत्त या वृत्तपत्रांच्या अभिप्रायावरून लक्षांत येईल.

हें बृहदारण्योपनिषद गद्य आहे. प्रत्येक कंडिकेचा भावार्थ प्रत्येक श्लोकांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. सर्वत्र भाषांतरांत "इंद्रवज्रा" वृत्ताचा उपयोग केला आहे. कांहीं कंडिका विस्तृत आहेत त्यांचा भावार्थ वृत्तासाठीं संकोचित झाला आहे. कांहीं ठिकाणीं उलट झालें आहे.

# ॥ ॐ ॥

# (५) बृहदारण्यकोपनिषद् अध्याय ४ था.



## ब्राम्हण २ रा

**वार्द्धके मुनिवृत्तीनांयोगेनांते तनुत्यजाम्। रघु वं. १-८**

## श्लोक

श्रीयाज्ञवल्क्यास नमी नृपाळ;

दे शिक्षणाला; जरि वेद--पाल
सम्राट, योगी पर--लोक कोठें?
त्वां जाणिलें कां! तरि सांग ओठें १

नेत्रांत पाहे पुरुषास सव्य;
हो 'इंद्र' नामें, परि 'इंध' दिव्य;
त्यानें वदे देव परोक्ष--नांव;
देवांस वाटे अपरोक्ष--भाव. २

स्त्री वाम--नेत्रांत, विराट भक्ष्य;
हृन्मंदिरीं लोहित--पिंड रक्ष्य;
नाड्या असे वस्त्र; हृदूर्ध्व नाडी
केशाहुनी सूक्ष्म. जिवास धाडी. ३

हा तैजस--प्राज्ञ दिगंतरास;
व्यापी तनूला हृदय--प्रवास;
'नेती' तुरीय प्रतिपादितात;
भीती नसे चिन्मय--मंदिरांत ४

## ब्राह्मण ३ रा

कर्मी असे भूप तसा विचारी;
श्रीयाज्ञवल्क्यास, कृती विचारी;
तत्त्वज्ञ, सम्राट पुसे तयाला--

प्रश्नास आधी, वर देइ त्याला १

प्रकाशे रवी चालतें सर्व काम;
द्विजांचीं कुळें गाति हो स्वैर--धाम;
तरी भास्करा सार्थ हें नाम आहे
तुझा अस्त होतां जगा कोण पाहे ? २

असे चंद्र सूर्यानुगामी प्रकाशी;
निशीं सृष्टिला जो स्वतेजें विकाशी;
'सुधांशू' असे सार्थ हें नाम ज्यातें;
असे अस्त कोण प्रकाशी जगातें ? ३

पुढें अग्नि येई प्रकाशी जगाला;
नयावीण नाहीं गती या कणाला
'बृहद्भानु' आहे खरें नाम ज्याला;
असे अस्त कोण प्रकाशी जगाला ४

पुढे वाणि येई करी कार्य त्यांचें
दिसेना निशीं होतसे ज्ञान वाचे
पहा 'ब्राह्मणी' नाम हें सार्थ आहे
असे अस्त तेव्हां जगा कोण पाहे ५

असे ज्योतिंचा अस्त साऱ्याहि लोकीं
परी आत्म--दीप्ती सदा ही विलोकी;

तिला 'सच्चिदानंद' नामें अनेक;
असे भिन्न नामें परी अर्थ एक ६

ज्योतींमधे हाच असे परात्मा;
हृद्यंतसाक्षी, पुरुषांतरात्मा;
स्वप्नामधें जो करितो प्रवेश
सादृश्य पावे मतिवृत्ति--वेश ७

स्वप्नापरी तो धरि अन्य देह
टाकी पुन्हा इंद्रियसंघ; गेह—
मोडी दुज्याचें, मिळवी तिजाला;
देहा धरी इंद्रिय--संघ--माला. ८

हा देह तैसा पर--देह आहे;
स्वप्नास तत्संधि मनांत पाहे;
साहित्य घेई पर--देह सेवी
भासे जसे स्वप्न मति--स्वदेवी ९

स्वप्नांत नाहीं रथ, मार्ग कांहीं;
बुद्धी बनोनी सुखदुःख पाही;
नाहीं तलावादि, नद्या, स्वभाव;
ऐसा स्वयंकर्तृमति-प्रभाव १०

स्वप्नामध्यें देह--मती दिसेना;

भासे तनू भिन्न, विकार--सेना;
येतो पुन्हां जागृतिला स्वभावें;
ज्योतिःस्वभाव--प्रभु मंत्र गावे; ११

स्वप्नांत रंगे मति--भास, वीर—
सांभाळितो प्राण तदा शरीर;
सिद्ध--प्रकाशी करि भेद--भाव;
अंतर्बाहिस्थ--प्रभु स्वभाव १२

स्वप्नामधे कार्य पवित्र कांहीं;
नीचोच्च--रूपें दिसती सदा हीं;
खेळे वधूशीं करि रंग नाना;
व्याघ्रादि--रूपें भय वासनांना. १३

क्रीडा जिवाची दिसते, न रूप;
जागें बळें हो, चुकवी स्वरूप;
स्वप्ना वदे जागृति तत्त्ववेत्ता;
मागे पुढें धेनु सहस्र घेता. १४

सुप्तींत जाई रमुनी स्वतांसी;
क्रीडा पुन्हां स्वप्न वरी क्रमासी;
पाहे, करीना कृत्ति, लिप्त नोहे—
ज्योतिःस्वरूपी वदती पुढें हें. १५

स्वप्नीं रते खेळवि वासनांना;
ये जागृतीला मग इंद्रियांना;
ज्योतिःस्वयंकर्तृक, लिप्त नाहीं
मोक्षाप्रती धेनु--सहस्त्र वाहीं १६

जागेपणीं इंद्रिय--संघ वागे;
स्वप्नामधे लीन मनांत भागे,
पाहे कृती मात्र, करी न कांहीं.
आहे स्वयं- कर्तृक चित्प्रवाहीं १७

जातो महामत्स्य नदीप्रवाहीं,
नद्वेग त्याते प्रतिबद्ध नाहीं,
स्वप्नास ये जागृतिला वरून
मुक्त स्वयंकर्तृक यावरून १८

आकाश--मार्गी खग खेळतात
विश्रांतिसाठीं तरु सेवितात
तैसी सुषुप्ती सुख--मात्र पाही
स्वप्नादिक--स्पंदन--काम नाहीं १९

नाड्या रसांनीं भरतात पूर्ण
वे वासना रंग--विकार तूर्ण
हर्ता बने चिद्विकृता--विलास

चित्संस्कृती जागृतिचा विकास २०

निष्काम, निष्पाप, न भीतिरूप
प्राज्ञांतरालिंगन घे स्वरूप
जैसे प्रियालिंगन बाह्य नेणें
आनंद–रूपांतर–शुद्ध लेणें २१

माता, पिता, चोर न पुण्य, पाप
कांहीं न जाणे, दिसतो न ताप
चिद्भासन। सिंधु–तरंग सारें
ज्योतिःस्वरूपी तरतील बा, रे २२

पाहे सुषुप्तींत न सृष्टि कांही।
द्रष्टा असे जागृत चित्प्रवाहीं
द्रष्ट्याविना सुप्तिंत नान्न कांही।
ज्योतिःस्वरूपी हृदयांत पाही। २३

घेई सुषुप्तींत न वास कांहीं
घ्राता असे जागृत चित्प्रवाहीं
घ्रात्याविना सुप्तिंत नान्य कांहीं
ज्योतिःस्वरूपी हृदयांत पाही २४

घेई सुषुप्ती न रसास कांहीं
आस्वादविज्जागृत चित्प्रवाहीं

त्याच्याविना सुप्ति न नान्य कांहीं
ज्योति:स्वरूपी हृदयांत राहो २५

बोले सुषुप्तींत न वाक्य कांहीं
वक्ता असे जागृत चित्प्रवाहीं
वक्त्याविना सुप्तित नान्य कांहीं
ज्योति:स्वरूपी हृदयांत पाहीं २६

ऐके सुषुप्तींत न शब्द कांहीं
श्रोता असे जागृत चित्प्रवाहीं
श्रोत्याविना सुप्तित नान्य कांहीं
ज्योति:स्वरूपी हृदयांत पाहीं २७

चिंतीं सुषुप्तींत न वस्तु कांहीं
मंता असे जागृत चित्प्रवाहीं
मंत्याविना सुप्तित नान्य कांहीं
ज्योति:स्वरूपी हृदयांत पाहीं २८

स्पर्शे सुषुप्तींत न वस्तु कांहीं
स्पृष्टा असे जागृत चित्प्रवाहीं
स्पृष्ट्याविना सुप्तित नान्य कांहीं
ज्योति:स्वरूपी हृदयांत पाहीं २९

जाणे सुषुप्तित न वस्तु कांहीं

ज्ञाता असे जागृत चित्प्रवाहीं
ज्ञात्याविना सुप्तिंत नान्य कांहीं
ज्योतिःस्वरूपी हृदयांत पाहीं ३०

पाहे, रसा घेइ, वदेल, ऐके
घे, वास, चिंतीं विषया विवेकें;
आहे जिथें भिन्न विकार--जाल
अन्योन्य सारे मग भावितात ३१

द्रष्टैक, सम्राट परमागती ही;
आनंद, संपत्, परमावधीही;
भूतें मुदें डोलति, घेति मात्रा;
आनंद--रूपी करितात यात्रा ३२

जे मानव-श्रेष्ठ--सुखैक जाण;
पित्रेक--गंधर्व सुर प्रमाण;
आजानदेव--श्रुतिदेव सारे;
बोले पुढें ! भीति मुनीस सारे ३३

घेतो पुन्हां जागृति जीव धाव;
पाहे, विचारी मनीं चित्स्वभाव;
स्वप्नांत भासे जगदादि सारें
राहे कसे ! मावुनि सर्व बा, रे ३४

गाडींत साहित्य भरून जाती
प्राज्ञास घे जीव चिदात्म--जाती
घे प्राण संगें करुणा--भयानें
उच्छ्वास होतो, जनता भया ने ३५

रोगें, जरेनें, कृशता वरावी
देठांतुनी पक्व फळें गळावीं
जातो तसा जीव, नवें शरीर—
घेतो पुन्हां, वाढतसे समीर ३६

राजा प्रवासी असतां तयारी,
ग्रामाधिकारी करितात सारी,—
खाणें पिणें; जीव नवीन येतीं,
भूतें तनूला मग भक्ष्य देती. ३७

राजा निघाला असतां प्रवासी;
ग्रामण्य त्या पोंचवितो, जिवासी;
उच्छ्वास होतो मग जीव जातां--
देहांतुनी; हें सगळें पहातां ३८

## ब्राह्मण ४ था,

सोनार घे हेम, नवें स्वरूप—
देई तयातें, धरि भिन्न रूप;

गांधर्व पित्र्यादि तनु--प्रकार;
पुण्यानुरूपें धरिती विकार. १

कर्मे घडावी रुजती मनांत,
देहा वरीती, रमती जगांत;
ध्यानापरी कर्म, कृतींत धर्म
संस्कार--चक्रांतिल होय वर्म २

जीवेंद्रियादीक वरून मात्रा
हृन्मंदिरीं प्राण जमून यात्रा
हृज्जोति--तेजांत मिळे स्वरूप
नेत्राभिमानी परते, न रूप - ३

द्रष्टा, न गंधा, न रसास घेई;
बोले, न ऐके, मति लीन होई;
देहांतुनी जाइ वरून विद्या—
प्रज्ञानुभूता हृदयीं अविद्या— ४

धेई जळूं टोंक पुढें तृणाचें
अग्रास सोडी मग मागल्याचे,
टाकी शरीरादि जुनें बिऱ्हाड
लग्नास जाई मिळवी वऱ्हाड ५

कर्मी जसा धर्म मनांत ठेवी;

लोकांतराला फल--रूप सेवी;
ज्याचीं मनी शुद्ध--चिदात्मभूत;
ज्योतिःस्वरूपी रमती विभूत; ६

टाकी जशी कात अही स्वतांची;
देहात्मभावास कधीं न याची;
होतो तसा जीव परांत लीन
ज्योतिःस्वरूपी सुखदुःखहीन ७

हा ज्ञानमार्ग श्रुतियुक्त सत्य;
ज्यां जाणिला अन्यजनीं सुकृत्य;
झाले किती मुक्त जगांत आज,
वेदांत सांगे नर--जन्म काज ८

मोक्षाप्रती साधन--मार्ग ऐका
तेजःस्वरूपी मति रंग घे कां
शुक्ला असे लोहित--नील--पीता,
पुण्यें कृतार्था विभुचित्सहीता,
९

संसार--संगें रमतात लोक,
नामें "अविद्या" तम कीं विलोक,
कर्मास जे लोक उपासितात,
'विद्या' तिला नाम गणा तमांत, १०

दु:खामधे रंगाति मोह—जाल,
द्रष्टा दिसेना, विषयीं सुकाळ,
जन्मे, मरे चक्र पुन:पुन्हां तें,
मंत्रें मुनी हें कथितात नातें, ११

ज्योति:स्वयंकर्तृक जाणशील
तत्त्वें असें होय समाधि--शील
कोणाकरीतां मग काय व्हावें !
दु:खें शरीरा नरिं कां पिडावें ! १२

हृन्मंदिरीं जाणुनि चित्स्वरूप,
हो सच्चिदानंद विकार--रूप
तो सर्व सृष्टीस करील हातें
ज्योति:स्वरूपी भज सच्चिदातें १३

येथें भजावा हृदयांत देव
नाहीं तरी येइल मृत्यु ठेव
जें जाणती ब्रह्म, न दु:ख त्यांस
ज्योति:स्वरूपी जगतांत वास १४

जो सच्चिदानंद गुहेंत जाणे,
भूतास, भव्यास मतींत ठाणें,
निंदील सांगा मग कोण कोण ?

लोपावयाला न मिळेल कोण १५

संवत्सराचे दिन भाग होती,
आदित्यरूपें फिरती सभोंती,
ज्योतींस या ज्योत चिदात्मरूप,
आयुष्य वाढे भजतां स्वरूप, १६

गंधर्व, देवासुर--राक्षसादी,
अव्याकृताकाश दिसे अनादी,
हे पंच जेथें जिरले समूळ,
ब्रह्मामृताला मिळती समूळ. १७

प्राणामध्ये प्राण असे जिवाचा,
डोळ्यांत डोळा दिसतो जगाचा,
श्रोत्रामध्ये श्रोत्र, मनांत चित्त
जाणे, असे तो परमात्मवित्त १८

जाणे मनानें विभुचें स्वरूप,
नाना नसे भाव इथें विरूप,
मृत्यूस जातो बहुधा दिसेल,
अद्वैत पाहे अमृता मिळेल. १९

एकस्वरूपी विभुचें स्वरूप,
त्यातें गणायास गती न रूप,

धर्मादि ज्यातें न विकार होती;
व्यापी जगाला, प्रकृती न होती. २०

प्राज्ञांतराला द्विज--चित्त जाणे;
हृन्मंदिरीं गा, विभु--तत्त्व बाणें;
अध्यापनाची मग कां अपेक्षा,
पाठांतराची दिसते न शिक्षा. २१

हृन्मंदिरीं देव वसे चिदात्मा;
सन्यास--योगी भजती सदात्मा;
क्तैपणा, पाप न, पुण्य कांहीं;
सेतू असे नित्य जगत्प्रवाहीं. २२

आत्मा समाधींत दिसे मुनीला
शांती, तितिक्षा, भजतात लीला
हें राज्य घे दास्य तुझें करीन;
ब्रह्मात्म--तत्त्वास सदा वरीन. २३

ये अन्न--संपद्भजतां विभूला;
सोपाधिकाला, जगदात्म--भूला:
अन्नाद, किंवा वसुदान नांव;
संसार--सौख्यांत मिळेल ठाव; २४
नाहीं जरा--मृत्यु, विकार कांहीं;

साक्षी असे सोज्वल चित्प्रवाहीं;
हृन्मंदिरीं ज्योति वसे विकाशी,
ॐ सच्चिदानंद मति--प्रकाशी २५

## ब्राह्मण ५ वा

श्रीयाज्ञवल्क्या असती द्विभार्या,
मैत्रेयि वैराग्य- मुमुक्षु--वर्या,
कात्यायनी स्त्री--गुण--धर्मयुक्त,
संन्यास घ्याया मुनि हो विरक्त १

मैत्रेयि, सन्यास घडावयास,
देतों धना वाटुनि, मी उदास,
आज्ञा मला द्या यति--धर्म घ्याया,
संसार--संगा त्यजि तत्त्व गाया. २

मैत्रेयि बोले मुनिला जगांत,
संपत्ति दे मुक्ति, नये कृतांत ?
नाहीं प्रिये, मुक्ति कधीं धनानें,
संपत्ति दे जन्म, जरा, जिवा ने ३

ज्यानें मिळे मुक्ति, धनास या दे,
तें जाणवी तत्त्व मला विवादें,
तज्ज्ञान--मार्गीं मन हें मुरावें,

ज्योतिःस्वरूपी विभु--पाद गावे ४

होसी प्रिया तूं मजसी जनांत,
अद्यापि मातें पुससी अनंत,
सांगें तुला मी परमार्थ--तत्त्व
आहे तुझें मानस शुद्ध--सत्त्व ५

जाया, पती, पुत्र, पशू, धनादी,
विद्या, प्रिया होति विकार, सादी,
आत्म्यामुळें हें जग आवडे, गा,
पाहे, विचारी मननें स्वये गा. ६

आत्म्याहुनी भिन्न जगास मानी;
तें दूर होतें, जरि त्यास वानी;
आत्मा असे व्यापक भूतजात;
मानूं नको भेद कधीं तयांत. ७

हो दुंदुभीचा जरि शब्द लोकीं;
शब्दास कोणी धरि, कीं विलोकी;
घे दुंदुभीतें, वरि दांडक्यातें;
आघात होतात कळेल नातें; ८

शंखध्वनी ये धरितां न हातीं;
कर्णी पडे वाजवितां, पहाती;

जेव्हां धरी शंख, मुखांत हातें;
शब्द--स्वरूपी मग जाण त्यातें; ९

वीणा करें वाजवितात लोक;
शब्दास कोणी धरिती, विलोक;
वीणा धरी वाजविणार हातें:
शब्द--स्वरूपी भ्रमतात वातें; १०

अग्नींतुनी या ठिणग्या निघाल्या;
ब्रह्मांतुनी वेद, पुराण, याल्या—
विद्या, तसे लोक, जलादि सारे;
निश्वास होती विभुचे पसारे ११

पाणी समुद्रीं, शिवणें त्वचेंत,
नाकामधे गंध, मधू जिभेंत
नेत्रांत रूपें, श्रुति शब्द जाणे
संकल्प चित्तीं:-समवाय ठाणें १२

ज्योतिःस्वरूपांतुन सर्व येतें
होतें तिथें लीन, न रूप ये तें
प्रज्ञानरूपी घनसच्चिदात्म
मैत्रेयिला हा कथितो सुखात्म १३

मैत्रेयि बोले, तव वाक्य आतां,

शंका मला दे, नच ये पहातां,
आत्मा दिसे हा अविनाश--धर्म,
सांगावयाचें मनुजास वर्म १४

'अन्योन्य' हें द्वैत मनांत बाणे
अद्वैत हें "कोण कुणास जाणे" !;
ज्ञाता जगाचा, वरि कोण त्यातें;
"नेतीति" रूपें भज सच्चिदातें. १५

**पंचमब्राह्मण समाप्त.**

## चतुर्थोध्याय ।



---

पान ५९ ओळ १४ यांत "आचार्यांनी" या ऐवजीं "आचार्यांना" व "आपलें" या ऐवजीं "आपलेंच" असें वाचावें.

**वि. सू.**– प्रस्तावना पान ५८ ओळ ७ [ अपर ] ऊर्फ हा शब्द अपर या संस्कृत शब्दाशी ध्वन्यर्थदृष्ट्या पूर्ण संबद्ध आहे. हें दर्शविण्यासाठीं ' ऊर्फ 'च्या नंतर लगेच कंसांत अपर हा शब्द घातला आहे. ब्रह्ममीमांसा यांतील 'ब्रह्म'शीं याचा संबंध नाहीं.

# चाऱ्ही हारांतील सजातीय पद्यपुष्पांची हारावली.



## सृष्टिः—

१ कवीची दृष्टि भा.१.पा.१. २ वसंत ऋतु १-१६. ३ वसंत ऋतु १-१७. ४ उद्यान १-११. ५ सृष्टि विलास २-२. ६ संध्याराग २-१८. ७ पुष्पगीत २-२१. ८ सृष्टीचें गणित २-५०. ९ सृष्टीचें व्याकरण २-५२. १० संक्रांतीचा हल ३-८. ११ सृष्टिसौंदर्य ३-१०. १२ दैवीचुंबन ३-१९. १३ संक्रांतीचा तिळगूळ ४-३०. १४ ,, ,, ४-४०, १५ सृष्टिविकार ४-३५.

## २ सामाजिकः—

१ संसारी जनांस उप १-२. २ प्लेगः—वर्णन १-५ ,, विधवाची स्थिति ,, स्त्रियांचे गुण ,, सुज्ञांस विनं ३ मातृपितृहृद्गत १-१४. ४ तान्हें मूल १-२३. ५ विवाह मंगल १-३८. ६ गृहिणी २-१०. ७ भाऊबीज-ओवा २-२३. ८ स्नेहगीत २-४८. ९ दिंवाळी ३-४. १० शिमगा ३-६. ११ ,, ३-७. १२ शिक्षक ३-१२. १३ वैद्यकसंमेलन ३-१५. १४ विवाह माधुरी ३-१६. १५ वसंत व्याख्या ३-१८. १६ ब्राह्मण ४-४१. १७ पंडितास ४-३३. १८ जीवितौघतरंग ४-३७. १९ शिक्षक कर्तव्य ४-३२. २० बालबोध—शत ४-४५. १ वडिलांचा मा. ,, ४६. २ थोर पुरुष ,, ४६. ३ वेळ ,, ४७. ४ उद्योग ,, ४७. ५ प्रीती ,, ४९. ६ सुविचार ,, ४९. ७ कुविचार , ५०. ८ अवलोकन ,, ५२. ९ कर्तव्यकर्म ,, ५३.

## ३ राष्ट्रीय



## ४ देवता:—

## ५ उपनिषदें.



## समाप्त.